








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४४ । अंक २ । नोव्हेंबर १९९०
कार्तिक-मार्गशीर्ष, शके १९१२.
किंमत ७ रुपये. वार्षिक वर्गणी ६० रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ५००/– संस्था : रु. ७५०/–

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

---



---

**संपादकीय पत्रव्यवहार :**
मे. पुं. रेगे,
संपादक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी ‘स्थायी निधी’ निर्माण केला आणि अनुदानसी दिले आहे.







अनुक्रमणिका

# नवभारत

नोव्हेंबर १९९०

## अ नु क्र म



## लेखक-परिचय


■ **वसंत पळशीकर :** ' समाज प्रबोधन पत्रिके 'चे काही काळ संपादक; विविध सामाजिक–राजकीय विषयांचे आणि समस्यांचे व्यासंगी अभ्यासक; अ-७, प्राध्यापक निवास, बोरावके महाविद्यालय, श्रीरामपूर–४१३ ७०९. ■ **अशोक चौसाळकर :** प्रपाठक, राज्यशास्त्र विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर–४१६००४ ■ **मे. पुं. रेगे :** संपादक ' नवभारत ' आणि ' न्यू क्वेस्ट '; ' रागिणी ', साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–४०० ०५१. ■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३.


❋ ❋

## संपादकीय

### हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (१३)*

मोक्ष हा चार पुरुषार्थांमधील एक पुरुषार्थ आहे असे मानण्यात काही अडचणी उद्भवतात असे आपण गेल्या लेखांकात म्हटले. ह्या अडचणींचे स्वरूप अधिक स्पष्ट करणे आवश्यक आहे.

'पुरुषार्थ' ह्या संकल्पनेतच असे अभिप्रेत असते की, एका विशिष्ट पुरुषार्थाचे (उदा., काम ह्या पुरुषार्थाचे) इतर विशिष्ट पुरुषार्थांशी (उदा., धर्म आणि अर्थ ह्या पुरुषार्थांशी) संतुलन साधणे आवश्यक असते. सुखी, सफल मानवी जीवनात अशी संतुलित, एकात्म पुरुषार्थाची साधना करण्यात येत असते आणि असा पुरुषार्थ (बऱ्याच प्रमाणात) साधलेला असतो. धर्म, अर्थ, काम हे विशिष्ट पुरुषार्थ म्हणजे ह्या एकात्म पुरुषार्थाची विशिष्ट अंगे किंवा पैलू असतात. आता धर्म, अर्थ आणि काम हा त्रिवर्ग घेतला किंवा त्रयी घेतली तर त्यांचा समन्वय किंवा संतुलन साधणे शक्य आहे असे मानण्यात काही अडचण दिसत नाही. व्यवहारात असे संतुलन साधणे कठीण असते, साधलेले संतुलन ढळण्याचा जीवनात सतत धोका असतो हे मान्य करूनही अशा संतुलित पुरुषार्थाच्या संकल्पनेतच काही आत्मविसंगती आहे असे मानायचे कारण दिसत नाही. धर्माला अनुसरून प्राप्त करून घेतलेल्या अर्थाचा विनियोग करून धर्ममान्य अशा कामाची (इच्छेची) तृप्ती एखाद्याने केली तर त्याने असा संतुलित पुरुषार्थ साधलेला असतो असे म्हणता येते. धर्म, अर्थ आणि काम ह्यांच्या वेगवेगळ्या प्रकारे साधलेल्या संतुलनावर आधारलेल्या भिन्न जीवनपद्धती असतात हे मानवी जीवनातील वैचित्र्याकडे पाहिले की सहज ध्यानात येते. पुरुषार्थाचे योग्य संतुलन साधण्याचा एखादा गणिती नियम आहे असे नाही. हे सर्व मान्य केल्याने 'संतुलित पुरुषार्थ' ही बरीचशी स्पष्ट व सुसंगत अशी संकल्पना आहे आणि चांगल्या मानवी जीवनाचे दिग्दर्शन करणे हे तिचे कार्य आहे हे मान्य करण्यात काही अडचण निर्माण होत नाही

पण धर्म, अर्थ, काम हा त्रिवर्ग एका बाजूला आणि मोक्ष हा पुरुषार्थ दुसऱ्या बाजूला असे घेतले, तर ह्या दोहोंचा समन्वय साधण्यात स्पष्ट अडचणी दिसून येतात. सांख्यांची मोक्ष (कैवल्य) ही संकल्पना आपण उदाहरणासाठी घेऊ. ज्या जीवाने मोक्ष साधलेला आहे, जो मुक्त झाला आहे अशा जीवाची अवस्था कशी असते ? त्या जीवाशी संबंधित असलेला पुरुष आता कोणतेही देह-मन हे आपले आहे, त्याच्यात उद्भवलेले अनुभव हे आपले अनुभव आहेत, त्याच्याकडून घडणाऱ्या क्रिया ह्या आपल्या क्रिया आहेत असे मानीत नाही. एक शुद्ध, म्हणजे ज्याच्या ठिकाणी केवळ जाणीव आहे, (जाणिवेचा 'प्रकाश' आहे) असे अस्तित्व एवढेच आता त्याचे स्वरूप असते. ही जाणीव कशाचीही जाणीव नसते; कोणत्याही वस्तूची जाणीव नसते. ती आत्म-जाणीवही नसते. अशा मुक्त जीवाला धर्म, अर्थ, काम हे पुरुषार्थ उरत नाहीत हे उघड आहे. ते त्याच्यापासून गळून पडलेले असतात. जोपर्यंत जीव मोक्षाची साधना करीत असेल तोपर्यंत त्याच्या जीवनात धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष ह्या चारही पुरुषार्थांना स्थान असते. धर्म-अर्थ-काम हे त्याच्या जीवनात साध्य म्हणूनही असतात. आणि सिद्धही होऊ शकतात. मोक्ष हे केवळ साध्य असते. पण जेव्हा मोक्ष सिद्ध होतो तेव्हा धर्म–अर्थ–काम ह्यांना मागे ठेवूनच मोक्ष साधण्यात आलेला असतो. जीव मुक्त होतो ह्याचा अर्थ असा, की जीव हे त्याचे स्वरूप मागे पडते, नष्ट होते, व त्याची जागा शुद्ध पुरुष ह्या स्वरूपाच्या अस्तित्वाने घेतलेली असते.

---

* या संपादकीयाचे पहिले बारा भाग अनुक्रमे जुलै ८८, जाने., फेब्रु., मार्च, एप्रिल, मे, नोव्हेंबर ८९ व मार्च, एप्रिल, मे, जून, जुलै ९० या अंकांत प्रसिद्ध झाले होते. हा तेरावा भाग.— संपादक.



अनुक्रमणिका

शुद्ध पुरुषाला जीवनच नसते, आपण स्वतः, वस्तू आणि इतर जीव ह्यांचे भान नसते आणि म्हणून त्याच्या जीवनात काही साधण्याचा किंवा काही साधले गेले असण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. चांगल्या मानवी जीवनात धर्म–अर्थ–काम–मोक्ष असे संतुलित पुरुषार्थ–चतुष्टय साधलेले असते ह्या म्हणण्याला काही अर्थ देता येत नाही.

सांख्याची मोक्षाविषयीची जी विशिष्ट संकल्पना आहे तिच्याशीच संबंधित असलेली अशी ही अडचण आहे असे म्हणता येणार नाही. अद्वैतासमोरही अशीच अडचण आहे. अद्वैतमताप्रमाणे जीवाला जेव्हा मोक्ष मिळतो तेव्हा त्याच्या जीव ह्या स्वरूपाचे विसर्जन होते आणि ब्रह्म हे अस्तित्व त्याची जागा घेते. आता ब्रह्म हा अनंत आणि केवळ आनंदमय असा अनुभव असल्यामुळे जेव्हा जीवाला मोक्षप्राप्ती होते तेव्हा त्याचे सर्व पुरुषार्थ परिपूर्णतेने साधले जातात असा दावा करता येईल. पण ब्रह्म म्हणजे जीव जो प्राप्त करून घेतो. अशी त्याची स्वतःची अवस्था नसते. कारण एक विशिष्ट जीव हे जीवाचे स्वरूप जोपर्यंत टिकून राहिलेले असते तोपर्यंत ब्रह्म हे स्वरूप त्याने प्राप्त करून घेतलेले नसते किंवा त्याला प्राप्त झालेले नसते. आणि जेव्हा ब्रह्म हे स्वरूप जीवाला प्राप्त होते तेव्हा एक विशिष्ट जीव हे त्याचे स्वरूप संपुष्टात आलेले असते. ब्रह्मानुभव हा **जीवाचा** अनुभव नसतो; ते जीवाचे साफल्य नसते. तेव्हा धर्म–अर्थ–काम–मोक्ष असा चतुर्विध पण संतुलित असा ज्याचा आशय आहे अशा पुरुषार्थाची सिद्धी ज्याच्यात झाली आहे अशा जीवनाची सुसंगतपणे कल्पना करता येत नाही. (जाता जाता अद्वैतमतातील आणखी एका अडचणीचा उल्लेख करणे योग्य ठरेल. मोक्ष (ब्रह्मानुभव) जेव्हा साधला जातो तेव्हा त्याचा साधक असलेला जीव उरत नाही एवढेच अद्वैताचे म्हणणे नाही. तर साधक जीव कधीच नव्हता, साधना नव्हती, बद्धावस्था नव्हती आणि म्हणून मोक्ष प्राप्त करून घेण्याचा प्रश्नच नव्हता. हे ज्ञान ब्रह्मानुभवाशी निगडित असते असे त्याचे म्हणणे आहे.)

पुरुषार्थ म्हणजे जीवाने जी प्राप्त करून घेणे इष्ट असते, योग्य असते अशी साध्ये. व्यक्तीचे साध्य म्हणजे जी गोष्ट तिला हवीशी असते, पण लाभलेली नसते आणि जी प्राप्त करून घेण्याचे तिने ठरविलेले असते अशी गोष्ट. ती प्राप्त करून घेण्यासाठी जेव्हा व्यक्ती प्रयत्न करते आणि ह्या प्रयत्नाचा परिणाम म्हणून जेव्हा ती व्यक्तीला प्राप्त होते तेव्हा त्या व्यक्तीने ते साध्य सिद्ध केले असे होते. हा मानवी कृत्याचा आकारच आहे. व्यक्ती जेव्हा एखादे साध्य सिद्ध करते तेव्हा जी गोष्ट आपल्याला हवी होती पण प्राप्त नव्हती ती आपण प्रयत्नपूर्वक प्राप्त करून घेतली आहे ही जाणीव तिला असते आणि आपली साधना सफल झाल्याचा आनंद ह्या जाणिवेचा घटक असतो. असिद्ध साध्य सिद्ध होणे हे केवळ स्थित्यंतर म्हणजे साधना नव्हे. स्वप्रयत्नामुळे हे स्थित्यंतर घडून आले ही जाणीव हा साधनेतील आवश्यक घटक आहे. आता सांख्य आणि अद्वैत ह्या मतांप्रमाणे ह्या स्वरूपाची साधना असूच शकत नाही कारण मोक्ष हे माझे साध्य मी माझ्या प्रयत्नाने सिद्ध केले आहे, बद्ध असलेला मी माझ्या प्रयत्नामुळे मुक्त झालो आहे ही जाणीव ज्याला आहे असा कुणी असूच शकत नाही. कारण सांख्यमताप्रमाणे केवळ चित्स्वरूप असा जो पुरुष आहे त्याला आत्मजाणीव नसते आणि म्हणून आपण आता मुक्त (झालो) आहोत ही जाणीव त्याला नसते. आणि आपण वर पाहिल्याप्रमाणे जीव जेव्हा मुक्त होतो, म्हणजे ब्रह्मरूप होतो तेव्हा आपण आता ब्रह्मरूप झालो आहोत अशी जाणीव बाळगू शकणारा जीव अस्तित्वात असू शकत नाही. कारण ब्रह्माहून भिन्न असलेला असा जीव असू शकत नाही सांख्य आणि अद्वैत ह्यांच्या मोक्षाविषयीच्या संकल्पनेत ही एक खरी अडचण आहे ह्यात शंका नाही.

विशिष्टाद्वैतासारखे मत घेतले तर त्यात ह्या प्रकारची अडचण उद्‌भवत नाही. सांख्य किंवा अद्वैत ह्या मतांप्रमाणे मोक्ष–सुटका– ही मूलतः अविद्येपासून किंवा अज्ञानापासून होणारी सुटका असते. हे अज्ञान म्हणजे व्यक्तीच्या आत्म्याला स्वतःच्या खऱ्या स्वरूपाविषयी असलेले अज्ञान असते अहंकारयुक्त अंतःकरण, ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, देह आणि ज्ञानस्वरूप आत्मा ह्यांचा मिळून जो जीव बनतो तो वस्तुतः आत्म्याहून– शुद्ध किंवा केवळ आत्म्याहून–भिन्न असतो. पण स्वतःहून भिन्न असलेला जीव म्हणजे आपणच असे अज्ञानामुळे आत्मा









मानतो. आणि त्यामुळे तो जगात आणि व्यवहारात गुंतला जातो. पण जेव्हा ह्या अज्ञानाचे निरसन होते आणि 'आत्म्याला' स्वतःच्या स्वरूपाविषयीचे खरे ज्ञान प्राप्त होते तेव्हा तो मुक्त होतो आणि त्याचे जगाशी जे गुंतलेपण होते ते गळून पडते. असे मानण्यातील अडचण, आपण वर पाहिले त्याप्रमाणे, अशी की मोक्ष साधू पाहणारा हा जो कुणीतरी असतो तो, जेव्हा मोक्ष साधला जातो तेव्हा मुक्तावस्थेचा धारक ह्या स्वरूपात असूच शकत नाही. जो मोक्षाचा साधक होता तो आता मुक्तावस्थेत आहे असे मानता येत नाही.

पण विशिष्टाद्वैती मताप्रमाणे जीवात्मा हा परमात्म्याहून, (ईश्वराहून) कोणत्यातरी प्रकारे, भिन्न असतो. हा भेद खराखुरा, वास्तव असतो. तो अज्ञानावर आधारलेला नसतो. मग अज्ञान कशात असते ? तर आपण परमात्म्यापासून स्वतंत्र आहोत, आपण स्वतंत्रपणे आपले कल्याण कशात आहे ह्याचा निर्णय करू शकतो आणि अशा रीतीने ज्याचा आशय निश्चित करण्यात आला आहे असे कल्याण साधण्याचा प्रयत्न करीत जगणे हा योग्य प्रकारे जगण्याचा मार्ग आहे असे मानण्यात अज्ञान आहे. उलट, परमात्म्याशी पूर्णपणे एकरूप होण्यात, म्हणजे त्याची भक्ती करण्यात, त्याला शरण जाण्यात, त्याची जी इच्छा असेल तीच पूर्णपणे स्वतःची इच्छा होईल असे वळण स्वतःला देऊन तसे जगण्यात माणसाचे परमोच्च व संपूर्ण श्रेय असते हे ओळखण्यात ज्ञान असते असा जो ईश्वरशरण भक्त असतो त्याला ईश्वराचा प्रसाद लाभतो आणि हा प्रसाद म्हणजे मानवी श्रेयावरचा कळस असतो.

सारांश, मोक्षात जी सुटका अभिप्रेत असते ती, विशिष्टाद्वैती मताप्रमाणे, जीवाची त्याच्या अहंकारापासूनची सुटका असते आत्म्याने अज्ञानाने स्वीकारलेल्या 'एक विशिष्ट जीव' ह्या स्वरूपापासूनची सुटका नसते. मुक्तावस्थेतही जीवात्म्याचे एक विशिष्ट जीवात्मा हे स्वरूप अबाधित राहते. आपण आणि परमात्मा ह्यांत द्वंद्व आहे असे जीवात्मा ज्या अज्ञानामुळे मानीत असे त्याचेच फक्त निरसन मुक्तावस्थेपूर्वी झालेले असते आणि त्याचे फळ आणि त्याची खूण म्हणून जीवात्म्याची परमात्म्याच्या ठिकाणी परम आणि शुद्ध भक्ती जडलेली असते आणि त्याला परमात्म्याचा प्रसाद प्राप्त झालेला असतो. तेव्हा मुक्तावस्थेतही जीवात्म्याच्या ठिकाणी आत्मजाणीव असते. आणि म्हणून "मी माझ्या प्रयत्नाने मोक्ष साधला– परमात्म्याच्या कृपेने जिची परिणती मोक्षप्राप्तीत होते अशी साधना माझ्या हातून झाली व ती यशस्वी झाली" अशी जाणीव मुक्तावस्थेत जीवात्म्याला असते. (अर्थात, ह्या जाणिवेत अभिमानाचा लेश असणार नाही. ईश्वराविषयीची अपार कृतज्ञता आणि पूज्यभाव असेल.)

तेव्हा, 'जीवात्म्याने मोक्षाची साधना करून मोक्ष प्राप्त करून घेतला ह्या विधानाला, विशिष्टाद्वैती दृष्टीतून, सुसंगत असा आशय देता येतो. सांख्य किंवा अद्वैती मतांच्या संदर्भात त्याला सुसंगत आशय देता येत नाही हे आपण पाहिले आहे. पण ह्यावरून, मोक्ष हा एक पुरुषार्थ आहे असे मानायचे तर त्यासाठी विशिष्टाद्वैती दर्शन स्वीकारणे भाग आहे असे निष्पन्न होत नाही. सांख्य किंवा अद्वैती मतांच्या संदर्भात 'मोक्ष' ह्या संकल्पनेला सुसंगत आशय देण्यात सैद्धान्तिक अडचणी येतात हे मान्य करूनही मोक्षाविषयीच्या त्यांनी प्रतिपादिलेल्या संकल्पनेचा व्यावहारिक पातळीवर स्वीकार करता येईल.

कांटच्या परिभाषेचा उपयोग करून असे म्हणता येईल, की 'मोक्ष' ही व्यावहारिक (प्रॅक्टिकल) संकल्पना आहे, सैद्धान्तिक (थिअरेटिकल) संकल्पना नव्हे. ह्याचा अर्थ असा, की 'मोक्ष' ह्या संकल्पनेचा उपयोग जग कसे आहे हे सांगण्यासाठी आपण करीत नाही; तर माणसाने कसे जगावे, जगण्याचा कोणता मार्ग श्रेयस्कर आहे हे सांगण्यासाठी करतो. म्हणजे जीवनाचे नियमन करण्यासाठी करतो. अर्थात, जीवनाचा अमूक मार्ग श्रेयस्कर आहे असे सांगण्यात जगाच्या आणि माणसाच्या स्वरूपाविषयीची काही विधाने सत्य आहेत असे अभिप्रेत, 'अभ्युपगत' (प्री-सपोज्ड) असेलच. पण ही सत्ये अस्पष्ट, धूसर असू शकतील. त्यांचा आणि सैद्धान्तिक सत्यांचा मेळ कसा घालायचा असा दार्शनिकांपुढे प्रश्न उभा राहील.

'मोक्ष हा पुरुषार्थ आहे' हे (वरील अर्थाने) एक व्यावहारिक तत्त्व म्हणून स्वीकारले तर त्यापासून एक गोष्ट सरळ निष्पन्न होते. ती अशी, की ज्या मानवी जीवनात धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष ह्या संतुलित






'चतुर्वर्गा'ची– चतुष्टयाची– साधना होत असते ते श्रेयस्कर मानवी जीवन होय. असे मानण्यात सांख्य आणि अद्वैत ह्या मतांप्रमाणे जी एक सैद्धान्तिक अडचण उपस्थित होते– एखाद्या व्यक्तीने आपला मोक्ष साधला आहे ह्या म्हणण्याला सुसंगत आशय देता येत नाही ही अडचण– ती आपण तात्पुरती बाजूला सारू असे वर सूचित केले आहे. पण ह्या दोन मतांप्रमाणे आणखीही एक अडचण निर्माण होते. धर्म-अर्थ-काम ही त्रयी एका बाजूला आणि मोक्ष हा पुरुषार्थ दुसऱ्या बाजूला असे घेतले तर त्यांचे संतुलन होऊच शकत नाही. कारण ते एकत्र नांदूच शकत नाहीत. सांख्यमताप्रमाणे मुक्तावस्थेतील 'पुरुषा'ला इच्छा, वासना, प्रेरणा असूच शकत नाहीत. म्हणून त्याच्या दृष्टीने काम हा पुरुषार्थ नसतो. आणि म्हणून त्याला अर्थ हा पुरुषार्थही नसतो. पुरुषाचा इतर पुरुषांशी संबंधच असू शकत नाही म्हणून त्याला धर्म हाही पुरुषार्थ नसतो. मुक्तावस्थेत धर्म-अर्थ-काम ह्या त्रिवर्गाची जागा मोक्ष हा एकमेव पुरुषार्थ घेतो. अद्वैतमता-प्रमाणेही धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष ह्यांचा परस्परसंबंध असाच आहे असे मानावे लागते.

मोक्षसाधनेच्या स्वरूपातही हा परस्परसंबंध प्रतिबिंबित होतो. धर्म-अर्थ-काम ह्या संतुलित त्रिवर्गाची साधना शक्य असते आणि श्रेयस्कर असते. धर्म-अर्थ-काम-मोक्ष ह्या संतुलित चतुर्वर्गाची साधना शक्य नसते. कारण मोक्ष साधणे म्हणजे धर्म-अर्थ-काम ह्याच्या पलीकडे जाणे असते. तेव्हा मोक्ष हा जर पुरुषार्थ असेल तर असे म्हणावे लागते की चांगल्या मानवी जीवनात, कोणत्यातरी टप्प्यावर, व्यक्ती धर्म-अर्थ-काम ह्यांपासून परावृत्त होऊन मोक्षाची साधना करीत असते. चांगल्या मानवी जीवनात प्रवृत्तीला–धर्म–अर्थ–कामाच्या साधनेला–स्थान असते; आणि निवृत्तीला–मोक्षाच्या साधनेलाही– स्थान असते. पण प्रवृत्ती आणि निवृत्ती ह्यांचा मेळ घालणे तत्त्वतःच अशक्य आहे. चांगल्या जीवनात प्रवृत्ती व निवृत्ती एका काळीच नांदू शकत नाहीत. कधी ना कधी प्रवृत्तीची जागा निवृत्ती घेते

आता परत विशिष्टाद्वैती मताप्रमाणे प्रवृत्ती आणि निवृत्ती ह्यांच्यामध्ये ह्या स्वरूपाचा विरोध संभवत नाही. सांख्य आणि अद्वैती मतांत ही अडचण उद्भवते कारण जो मुक्त असतो ( किंवा जे मुक्त असते ) त्याचा ज्या अंतःकरणात वासना उद्भवतात त्याच्याशी, ज्या जगात ह्या वासनांचे समाधान करायचे त्याच्याशी आणि ज्या इतर व्यक्तींच्या संबंधांत त्यांचे समाधान करायचे त्यांच्याशी संबंध उरत नाही. आणि म्हणून काम, अर्थ आणि धर्म ह्या पुरुषार्थांना त्याच्या अनुभवात स्थान नसते. पण विशिष्टाद्वैतापुढे ही अडचण नाही कारण मुक्तावस्थेतही जीवात्म्याचा परमात्म्याशी, जगाशी आणि इतर जीवात्म्यांशी संबंध टिकून राहतो. ह्यामुळे मुक्त जीवात्म्याच्या अनुभवात धर्म-अर्थ-काम ह्यांना स्थान असते. फक्त हे पुरुषार्थ ईश्वरावरील भक्ती आणि ईश्वराचा प्रसाद ह्यांच्यामुळे शुद्ध आणि उज्ज्वल झालेले असतात.

इतर दर्शनांपुढे प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचा मेळ कसा घालायचा हा प्रश्न उभा राहतो. ह्याचे एक तर्कसंगत उत्तर आपण वर पाहिले. ते असे, की हा मेळ घालता येत नाही, निवृत्तीला प्रवृत्तीची जागा घ्यावी लागते आणि मोक्ष हा सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ असल्यामुळे निवृत्ती ही प्रवृत्तीपेक्षा श्रेष्ठ होय. अंतिम दृष्टीने पाहता मोक्ष हाच एकमेव पुरुषार्थ आहे. पण ह्या प्रश्नाचे दुसरे एक उत्तर 'स्थितप्रज्ञ' ह्या संकल्पनेत सूचित होते.

(अपूर्ण)

# नर्मदा : माता की बटीक ?

वसंत पळशीकर

डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर मान्यवरांकडून प्रशंसा प्राप्त झालेले प्रथितयश लेखक आहेत. त्यांची 'विज्ञानेश्वरी', 'तुम्हाला विज्ञान युगात जगायचय', 'बखर राजधानीची', व 'प्रकाशवाटा' ही पुस्तके गाजलेली आहेत. 'बखर राजधानीची' आणि 'प्रकाशवाटा' या दोन पुस्तकांचे स्वरूप 'शोधयात्रां'चे आहे. ही पुस्तके वाचणाऱ्यांच्या एक गोष्ट ध्यानात आलेली आहे, किंवा असायला हवी. शास्त्रज्ञ-संशोधक दाभोळकर हे एक अधिकच यशस्वी 'शोध पत्रकार' ( इन्व्हेस्टिगेटिव्ह जर्नलिस्ट ) केव्हाही ठरू शकतील.

नर्मदेवर बांधल्या जाणाऱ्या दोन महाकाय धरणांच्या विरोधात जे आंदोलन उभे राहिलेय त्यामुळे दाभोलकरांचे ध्यान नर्मदेकडे आकर्षित झाले. त्यांनी त्यांच्या खास पद्धतीने नर्मदा प्रश्नाची परिक्रमा करणारी शोधयात्रा केली. तीमधून 'माते नर्मदे' * हे पुस्तक तयार झाले.

'शोध-पत्रकारिते'चा एक विशेष आहे. शोध-पत्रकार हा ज्यांचा शोध घेतो त्या व्यक्ती वा प्रकरणे यांना काकदृष्टीने उघडे पाडण्याला, त्यांची सर्व प्रकारची न्यूने हेरायला वचनबद्ध असतो, उत्सुकही असतो. तीच त्याची व्यावसायिक विशेषता असते. वाचकांची त्याच्याकडून ती अपेक्षा असते. आणि या प्रकारे उणीदुरी काढण्यात एक खोलवर मजाही त्या पत्रकाराला बहुधा येत असते. शोधयात्रेमागील प्रेरणा व हेतू या संमिश्र, गुंतागुंतीच्या व खोलवर अर्थाने त्या व्यक्तीच्या आतमधून येणाऱ्या असतात. शोध करणारा पत्रकार क्वचितच तटस्थ असतो वा शेवटपर्यंत तसा राहतो. आरंभासही त्याची कशाला तरी बांधिलकी असतेच. ही बांधिलकी त्याला शोधाच्या ओघात कोणत्या तरी एका पक्षाचे बनविते. शोध-पत्रकारिता शोध घेणाऱ्या पत्रकाराला युयुत्सु बनविते; तो हिरिरीने आखाड्यात उतरतो. बहुधा अखेरीस पत्रकारितेच्या लक्ष्य व्यक्ती बनतात. यशस्वी शोध-पत्रकारितेच्या शोधयात्रेच्या अखेरीस काही व्यक्तींची प्रतिमा धुळीस मिळालेली असते तर काहींची विरुद्ध टोकाला उजळून निघालेली असते.

दुर्दैवाने दाभोलकरांनी केलेली शोधयात्रादेखील या सामान्य नियमाला अपवाद ठरलेली नाही. धरण-विरोधी आंदोलनातील प्रमुख कार्यकर्त्या व्यक्तींना खलनायकाची भूमिका बहाल केली गेलीय तर प्रकल्पाचे प्रवक्ते, तंत्रज्ञ व नियोजनकार हे नायक ठरले आहेत. बाबा आमटे, क्लॉड अल्वारीस, सुंदरलाल बहुगुणा, स्मितू कोठारी व मेधा पाटकर यांच्यावर चिकित्सक प्रकाशझोताचा विशेष रोख आहे तर श्री. माधववर चितळे यांच्यावर गौरवपर झोत सतत टाकला जातो. सरदार सरोवर व नर्मदासागर ( किंवा इंदिरा सरोवर ) या धरणांचा पक्ष ज्यांचा आहे त्या शास्त्रज्ञ, योजनाकार, अभियंत्यांचे वकिलपत्र दाभोलकरांनी आपण होऊनच स्वतःकडे उत्साहाने घेतले असल्याची छाप मनावर उमटते. असे म्हणूया की शोधयात्रेच्या ओघात त्यांना जी सत्याची प्रचीती आली तिच्यामुळे त्यांना योग्य वाटणाऱ्या पक्षाची बाजू हुशारीने, वकिली चातुर्याने, आक्रमकतेने मांडावयाची त्यांनी ठरविली.

दाभोलकरांच्या विवेचनाचे मात्र काहीसे पृथक् भाग पडतात– १) नर्मदाप्रकल्पाशीच निगडित काही मुद्द्यांचे विवेचन, २) मोठ्या-छोट्या धरणांसंबंधी डावे-उजवे करणारे विवेचन, ३) पर्यायी विकासनीती व पर्यावरणाचे संतुलन यांच्याशी संबंधित विवेचन आणि ४) ज्या लोकांच्या मुलाखती त्यांनी घेतल्या त्यांतल्या पर्यावरणवादी, पर्यायी विकासनीतीवाल्यांबद्दलची, त्यांना निमित्त करून एकंदरीतच या मंडळींविषयी केलेली शेरेबाजी. याशिवाय स्वतःविषयीही दाभोलकर वेळोवेळी पुष्कळ काही लिहितात, तो त्यांच्या शैलीचा, मनात खंत निर्माण करणारा, एक अविभाज्य विशेष

* राजहंस प्रकाशन, पुणे; १९९०; किंमत ७० रुपये.








आहे. पुस्तकाचा हा भाग अर्थातच आपण दृष्टिआड करायला हवा.

नर्मदाप्रकल्पाशी निगडित असे मुद्दे उपस्थित करण्याच्या ओघात मोठ्या धरणप्रकल्पांच्याच विरोधात मांडल्या जाणाऱ्या अशा पुढील सर्वसाधारण मुद्द्यांचाही परामर्श दाभोलकरांनी घेतला आहे: १) धरणे व भूकंप यांचा संबंध, २) जंगलांचा नाश, ३) मोठी धरणे व छोटी धरणे यांची तुलना, ४) भूजलाचा वापर व कालव्यांद्वारा होणारा पाणीपुरवठा यांची तुलना, ५) जमिनी नापीक बनण्याचा धोका, ६) धरणांमध्ये साचणारा गाळ, ७) धरणांपासूनचे लाभ, ८) आदिवासींचे विस्थापन व त्यांच्या वैशिष्टयपूर्ण संस्कृतींचा विनाश आणि ९) वीजनिर्मिती.

पर्यायी विकासनीतीवर पुस्तकात अधूनमधून शेरेबाजी येत राहते. पर्यायी विकासनीतीचा विचार मांडणाऱ्यांनी केलेली मांडणी विस्ताराने कोठेच न देता ही शेरेबाजी चालते. पुस्तकाच्या शेवटी त्यांनी पर्यायी विकासनीती, आदिवासींची वैशिष्टयपूर्ण जीवनसंस्कृती यांच्याबद्दलचे श्री. ना. ग. गोरे, श्री. शरद जोशी व प्रा. स. ह. देशपांडे यांचे उद्‌गार दिले आहेत.

मोठ्या धरणप्रकल्पांना, विकासाच्या आजच्या नमुन्याला जो विरोध आहे त्यामागे आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय पातळीवर राजकारणी कारस्थाने व डाव आहेत असे त्यांचे प्रतिपादन असल्याचे त्यांच्या शेरेबाजीवरून ध्यानात येते. आपल्या म्हणण्यास आधार म्हणून त्यांनी विरोधकांपैकी काहींच्या लेखनातली काही वाक्ये टाकली आहेत. पुस्तक प्रकाशनानंतर 'महाराष्ट्र टाईम्स' दैनिकात झालेल्या पत्रव्यवहारात, नर्मदाप्रकल्प व तत्सम विकास प्रकल्पांना, आणि एकंदरीतच विकासाच्या प्रचलित नीतीला, असलेला विरोध हा शुद्ध हेतूंपोटी नाही, त्यामागे मोठा डाव आहे. हा आपण लावलेला विशेष शोध आहे असा दावा दाभोलकरांनी केला आहे. या संदर्भात दोन प्रकारचा डाव त्यांना आढळून आला. एक आहे आंतरराष्ट्रीय राजकारण-अर्थकारणाच्या पातळीवरचा भारताला दुबळे व परावलंबी ठेवण्याचा. दुसरा भारतातील अंतर्गत राजकीय शक्तींचा. अलगतावादी, फुटीर भूमिकेमधून देशभरच्या आदिवासींना संघटित करून, त्यांच्याकरवी भारतीय एकात्मतेला व प्रगतीला शह देऊन येथे काही वेगळीच उलथापालथ घडवून आणण्याच्या प्रयत्नात काही मंडळी आहेत, व ही मंडळी विस्थापनाचे, पर्यावरणीय संकटाचे हिरवे बावटे दाखवून अडवणूक करू पाहात आहेत असाही आरोप दाभोलकर करतात. दाभोलकर म्हणतात, "आपला आक्षेप एवढ्यासाठीच आहे की, विकासाचा आजचा ढाचा बदलला जावा म्हणून अर्धेकच्चे तांत्रिक मुद्दे, आदिवासींचे प्रश्न व परकीय शक्तींची मदत यांच्या जोरावर हे लोक नर्मदाप्रकल्पास खोड घालताहेत." आणखी एका ठिकाणी ते म्हणतात, "आणि आमची अडचण एवढीच आहे की, तहानेने आणि भुकेने व्याकुळलेल्या या देशातील माणसांच्या पोटात अन्न आणि पाणी कसे घालता येईल हे तुम्ही आणि ते (म्हणजे प्रकल्पविरोधक व परकीय पर्यावरणवादी) कोणीच आम्हाला शास्त्रीय परिभाषेत सांगू शकत नाही!"

प्रस्तुत परीक्षणलेखात त्यांनी उपस्थित केलेल्या सगळ्या मुख्य मुद्द्यांची दखल घेण्याचे योजले आहे.

× × ×

नर्मदेवरील ही दोन धरणे, टिहरी धरण ही भूकंपप्रवण क्षेत्रात बांधली जात असल्याने धरणे पूर्ण झाल्यावर मोठे भूकंप होण्याची दाट शक्यता आहे. तसे झाल्यास लोकांच्या मालमत्तेचे व जीविताचे फार मोठ्या प्रमाणावर नुकसान होणे संभवते. धरणाची भिंतही टिकाव धरू शकणार नाही इतका मोठा भूकंप होऊ शकतो. हा युक्तिवाद करून या धरणांना विरोध केला जात आहे.

या मुद्द्याचा निकाल लावण्याचा प्रयत्न दाभोलकरांनी केला आहे. जेथे जेथे मोठी धरणे बांधून जलाशय निर्माण केले गेले तेथे तेथे जलाशयांच्या निर्मितीमुळे भूकंप होऊन नुकसान झाले आहे, असा प्रतिपक्षाचा युक्तिवाद आहे असे त्यांनी उगाचच गृहीत धरले आहे. भूकंपप्रवणता, भूकंपाच्या घटना, भूकंपाची तीव्रता या गोष्टींची स्वतंत्र भूगर्भशास्त्रीय कारणे आहेत हे कोणाला अमान्य नाही. भूकंपप्रवण क्षेत्रात महाकाय धरणे बांधण्यात धोका कितपत आहे असा नेमका प्रश्न आहे. अशा क्षेत्रात बांधलेल्या महाकाय धरणांमुळे त्या त्या क्षेत्रात भूकंपाचे धक्के बसण्याच्या घटना वारंवार घडू लागलेल्या आढळतात असे लक्षात आले आहे, व हा मुद्दा महाकाय धरणे बांधण्याच्या विरोधात जाणारा आहे, असा धरण-विरोधकांचा युक्तिवाद आहे,

अनुक्रमणिका

'द सोशल अँड एन्व्हायर्नमेंटल इफेक्ट्स ऑफ लार्ज डॅम्स' या त्रिखंडात्मक ग्रंथाचा निर्देश दाभोलकरांनी केला आहे. या ग्रंथात केलेल्या युक्तिवादाचा वा माहितीचा प्रतिवाद त्यांनी खरोखरी केलेला नाही. त्यांनी रुडकी (उत्तर प्रदेश) येथील स्कूल ऑफ रिसर्च अँड ट्रेनिंग इन अर्थक्वेक इंजिनीअरिंग या संस्थेचे निवृत्त संचालक डॉ. जयचंद्र यांचा हवाला दिला आहे. डॉ. जयचंद्र यांच्या म्हणण्यानुसार 'धरणाच्या विभागास त्यापूर्वीचा विवर्तनिक आधार (Tectonic history) असेल, तरच अशा (४ ते ६ वा अधिक रिक्टर) तीव्रतेचे भूकंप येतात.' अशा धक्कयांनी नुकसान पोचू शकते. असे तीव्र भूकंप झालेलेही आहेत हे डॉ. जयचंद्रही म्हणतात. मग प्रश्न असा उरतो की, नर्मदेवरील धरणे, टिहरी धरण अशा विभागांमध्ये येतात की नाही ? याचे विवेचन दाभोलकरांच्या पुस्तकात नाही. अशा तीव्रतेचे भूकंप झाले तरी धरणाची भिंत फुटणार नाही. इतके भक्कम व टिकाऊ धरण बांधण्याची तंत्रवैज्ञानिकक्षमता भारतीय अभियंत्यांजवळ आहे असा निर्वाळा ते कोयनेच्या उदाहरणाच्या आधारे देतात. आराखडा तयार करण्याची क्षमता आणि प्रत्यक्षात धरणाची भिंत किती चोखपणे ठेकेदार–सरकारी अधिकारी बांधतील यात फार मोठे अंतर राहू शकते हा मुद्दा आपण सोडून देऊ. पण कोयनेचे धरण १९६७ च्या भूकंपानंतरही फुटले नाही, व आजवर परत तेवढा मोठा भूकंप झाला नाही या पुराव्याआधारे आपण सरदार सरोवर वा नर्मदासागर वा टिहरी या धरणांचे भविष्य पूर्ण सुरक्षित आहे असे म्हणू शकत नाही. विवर्तनिक 'इतिहासा'च्या आधारे तीव्र भूकंपांची शक्यता तेवढी आपण अजमावू शकतो. शिवाय धरणाची भिंत फुटली नाही तरी भूकंपाच्या धक्क्याने नुकसान होणे टळत नाही.

तात्पर्य असे की, तंत्रवैज्ञानिक खबरदारी पूर्णपणे घेऊन आराखडा तयार करण्याचे ज्ञान भारतीय अभियंत्यांपाशी आहे, त्या ज्ञानाच्या जोरावर धोका पत्करूनही धरणे बांधावयाचा निर्णय आम्ही करीत आहोत, आणि धरणही फुटणार नाही व असह्य व अक्षम्य असे लोकांचे नुकसान होणार नाही अशी आशा / भरवसा आम्ही (भारतीय जनतेच्या अपार सहनशीलतेच्या व दैवास बोल लावण्याच्या वृत्तीच्या आधारे ?) बाळगून आहोत एवढीच भूमिका धरण-समर्थकांनाही दाभोलकरांच्या युक्तिवादाच्या आधारे घेता येईल. तीव्र भूकंपांची शक्यता व त्यापासूनचे धोके दाखवून दिल्यावर, धरणे फुटणारच, प्रलय होणारच या प्रकारचे भविष्य आपण वर्तवू शकत नाही हे धरण-विरोधकांनीही स्वीकारावयास हवे.

नर्मदाप्रकल्प व टिहरी या संदर्भात सर्व अभ्यास उपलब्ध करून देऊन खुली व परिपूर्ण चर्चा घडवून आणण्याचे महत्त्व मग स्पष्ट होते. ही चर्चा धरणे बांधल्याने त्रस्त होणार असलेल्या जनसामान्यांपर्यंत पोचण्याचेही महत्त्व आहे. अशा खुल्या सहभागी चर्चेचे महत्त्व व आवश्यकता दाभोलकरही प्रतिपादतात. पण ती एक पूर्वशर्त बनविण्याची आवश्यकता आहे. धरण-विरोधकांची ही मागणी मान्य न होण्याबद्दल दाभोलकर मौन पाळतात हे खटकते.

येथवरच्या गोष्टी ध्यानात घेतल्या तर असे स्पष्ट होईल की भूकंपप्रवणतेचा विरोधकांचा मुद्दा लेचापेचा नाही. दाभोलकरांच्या लिखाणाचा 'निष्कर्ष' मात्र विरोधकांना 'अर्धवट' व हास्यास्पद ठरविणारा आहे. त्यांच्या युक्तिवादाच्या मांडणीत व युक्तिवादाच्या निवडीत वकिली चलाखी व कौशल्य जरूर आढळते पण अभ्यासकाची तटस्थता व न्यायबुद्धी आढळत नाही असे खेदाने म्हणावे लागते.

× × ×

दाभोलकर पृ. ६६ वर लिहितात, "दारिद्र्यरेषेखाली असलेल्या तीस कोटी लोकांना आपणाला पुरेसे अन्न द्यावयाचे आहे. वाढणाऱ्या लोकसंख्येची सोय करावयाची आहे. सर्वसामान्य माणसाला अधिक चांगले जीवनमान द्यावयाचे आहे. यांतील अगदी तिसरी गोष्ट बाजूला ठेवलीत आणि पहिल्या दोनच गोष्टी विचारात घ्यावयाच्या म्हणालात तर चित्र काय आहे ? या पहिल्या दोन प्रश्नांना उत्तर देईल, ते प्रश्न सोडवेल, अशी पर्यायी व्यावहारिक विकासनीती आपणासमोर आहे का ? एखाद्या विभागात तरी प्रयोगाच्या स्वरूपात ती नीती पारखून घेण्यात आली आहे का ? तसे जर नसेल तर मग मोठ्या धरणाला आपल्यासमोर काही पर्याय खरोखरच आहेत का ?"

दारिद्र्यरेषेखालील तीस कोटी लोकांना पुरेसे अन्न कधी मिळेल, आज इतके सारे लोक गरीब, उपाशी असूनही दुसरीकडे गोदामांमध्ये मावत नाही इतके अन्नधान्य का शिल्लक राहते हा प्रश्न दाभोलकरांनी प्रथम

विचारासाठी घ्यायला हवा होता. अन्नधान्य पुरेसे नसताना व्यावसायिक स्तरावर व मोठ्या प्रमाणावर दुधाचा व कोंबडीपालनाचा व्यवसाय वाढतोय, शेतजमिनींचा वापर या व्यवसायांसाठी केला की माणसांच्या अन्नपुरवठ्यावर विपरीत परिणाम होतो. हे स्थित्यंतर का घडून येत आहे? हा प्रश्नही त्यांनी विचारावयास हवा होता. तीस कोटी भारतीयांना पोटाला पुरेसे अन्न सर्वप्रथम कसे मिळेल ही चिंता ज्याला खरोखरी आहे त्याला इतरही काही प्रश्न पडतील. उदाहरणार्थ, १९४३ साली बंगालमध्ये जी अपरंपार प्राणहानी झाली ती अन्नाचे साठे असतानाही. अन्नधान्य बाजारात पुरेसे हवे तसा लोकांच्या खिशात पुरेसा पैसाही हवा. त्यासाठी रोजगार हवा. नर्मदा, टिहरीप्रकल्पांसारख्या प्रकल्पांचे समर्थन करण्यापुरताच दाभोलकरांना हा युक्तिवाद वापरावयाचा आहे ही खंत निर्माण करणारी गोष्ट आहे.

एखाद्या विभागात पर्यायी नीती अवलंबून पडताळा पाहण्याचे काम शासनाचे आहे. पर्यायी नीतीची परिणामकारकता सिद्ध करणारे प्रयोग आपल्या डोळ्यांसमोर आहेत. महाराष्ट्रातल्या आडगाव, राळेगणसिद्धी (विश्वासराव साळुंखे यांचे), नायगाव (पाणी पंचायत), कोकणातील विल्ये ही अशी काही उदाहरणे आहेत. एकेका गावशिवारामध्ये जंगल व कुरणे, शेतजमिनी, गुरेढोरे आणि पाणी यांचा सम्यक अन्योन्याश्रय प्रस्थापित झाला तर काय होऊ शकते याची केवळ चुणूक या प्रकल्पांनी दाखवून दिली आहे. या गावांचा कायापालट असे निश्चितपणे दाखवतो की अन्नधान्याच्या बाबतीत जलद स्वावलंबी बनण्याचा हा अत्यंत प्रभावी कार्यक्रम आहे. कारण या कार्यक्रमाद्वारे रोजगारही गावोगाव उपलब्ध होणार आहे. जंगल व कुरणे यांचे संवर्धनपण होणार आहे. या उपाययोजनेची क्षमता एका नदीच्या खोऱ्यात समग्र व एकात्म स्वरूपात राबवून त्यातील सामर्थ्य व मर्यादा पडताळून पाहण्यात जलसंपत्ती मंत्रालय व केंद्रीय जल आयोग यांनी आजवर पुढाकार घेतला नाही. दाभोलकरांना त्याबद्दल काहीच म्हणावयाचे नाही ही गोष्ट बोलकी आहे.

दारिद्र्यरेषेखालील तीस कोटी लोकांना व वाढत्या लोकसंख्येला पुरेसे अन्नधान्य पुरवावयाचे तर मोठी व अजस्र धरणे बांधणे अत्यावश्यक आहे हा जलसिंचन खात्याच्या अभियंत्यांचा युक्तिवाद चिकित्सक दृष्टीने तपासून पाहण्याचे काम दाभोलकरांनी केलेले नाही. १९७० नंतरच्या काळात वाढलेल्या उत्पादनाचे सारे श्रेय धरणप्रकल्पांना आहे असे आपण क्षणभर मान्य करूया. तरीही अन्नधान्याचे उत्पादन वाढविण्याची तीच एकमेव नीती व्यवहार्य होती असे सिद्ध होत नाही. शेतकी व पशुसंवर्धन, जंगल व जलसिंचन या खात्यांनी एकत्रितपणे विचार करून कधी तरी नीती ठरवली का, हा प्रश्न दाभोलकरांनी उपस्थित करावयास हवा होता. देशभरच्या सामान्य माणसांची अन्नाची गरज योग्य प्रकारे भागवावयाची तर कोणत्या पिकांचे उत्पादन वाढवावयास हवे, ते सर्वत्र वाढवावयाचे तर कोणत्या पिकावर कोणत्या प्रदेशात भर द्यावयास हवा, कोणत्या शेतीउत्पादनांवर प्रतिबंध घालावयास हवा, त्या त्या प्रादेशिक पिकांचे उत्पादन वाढवावयाचे तर जलसिंचन कोणत्या स्वरूपात वाढवावयास हवे, जलसिंचनविषयक पायाभूत गरज कोणाची व कोणती आहे हे मुद्दे विचारात घ्यावयाची जबाबदारी दाभोलकरांची होती. पर्यायी विकासनीतीचा पुरस्कार करणारी काही मंडळी तरी हे मुद्दे उपस्थित करून त्याची भूमिका मांडीत आहेत. 'हिरवी क्रांती' व मोठी धरणे यांचा पुरस्कार करणाऱ्यांना एकंदर शेतीउत्पादन वाढवण्यात स्वारस्य आहे. तसे ते वाढले की या देशातल्या सर्व लोकांची पोटे भरणार असे त्यांनी गृहीत धरले आहे. शेतीच्या क्षेत्रातल्या आजच्या नीतीमुळे शेतमालाचे उत्पादन वाढल्याचे दिसत असले तरी वेगवेगळ्या प्रकारचे असमतोल निर्माण झाले आहेत व सर्वांच्या पोटात पुरेसे अन्न जातेय असेही होत नाही. या परिणामांची दखल घेऊनच पर्यायी विकासनीतीची निकड प्रतिपादिली जात आहे. दुधाचे उत्पादन आजच्या नीतीचा परिणाम म्हणून वाढले, की श्रीखंड, चीज, चॉकलेटसारखी उत्पादने करण्याचा व्यवसाय वाढतो पण गावोगावची सामान्य मुलेबाळे, माणसे वंचितच राहतात. दोन वेळचे पोटभर जेवण न मिळणारे लोक एकीकडे असतानाच शहरी बाजारपेठांसाठी वेगवेगळे 'फूड प्रॉडक्शन' बनविण्याच्या योजना शेती किफायतशीर ठरावी म्हणून हाती घ्याव्या लागतात. फळांचे उत्पादन वाढते पण चांगल्या प्रतीची फळे स्वस्तात गोरगरिबांना खायला मुबलक उपलब्ध होत नाहीत; त्यांची निर्यात करण्यास उत्तेजन दिले जाते. अन्न पुरेसे नसतानाच फुलांचे उत्पादन व्यवसाय

म्हणून शेतकरी करू लागतात. वादविवाद सभा गाजविण्याच्या वा जिंकण्याच्या मर्यादेतच 'तीस कोटी गरिबांच्या पोटाचे काय ?' हा युक्तिवाद करायचा असेल तर गोष्ट वेगळी. एरवी दाभोलकरांना पुष्कळ अधिक खोल पाण्यात उतरायला हवे.

मोठ्या धरणांखेरीज अन्य कोणत्याही उपायांनी अन्नधान्याचे उत्पादन पुरेसे वाढविता येणार नाही असे ठरले तर 'काही जमीन व काही जंगले पाण्याखाली जाणार हे आपद्धर्म म्हणून आपणाला स्वीकारावे लागेल' हे दाभोलकरांचे म्हणणे मान्य करावयास माझी व माझ्यासारख्या अनेकांची तयारी असेल. पण ज्याला आपण आपद्धर्म म्हणतो ती गोष्ट, इतर सर्व उपाय करूनही उद्दिष्ट साध्य होत नाही तेव्हाच करतो. येथे तर मोठी अजस्र धरणे बांधावयाची हे अग्रक्रमाने प्रथमच ठरविलेले आहे! 'अन्य उपाय आपण आधी करून पाहू व ते अपुरे पडले तरच मग मोठी धरणे बांधण्याकडे वळू' ही भूमिका धरण-समर्थकांनी स्वीकारावी असे वास्तविक दाभोलकरांनी म्हणावयास हवे होते. आपद्धर्माची भाषा ही खरोखरच मनापासून ते करीत आहेत का, असा यामुळे प्रश्न पडतो.

'मोठ्या धरणांची अनिवार्यता त्यांनी मानली आहे. ती का मानली आहे वा मानावी लागते यासाठी कोणताच समर्पक युक्तिवाद ते करीत नाहीत. त्यांनीच दिलेल्या कसोटीवर मग ती एक 'वैज्ञानिक आंधळी समजूत' ठरते.

× × ×

मोठी धरणे अधिक श्रेयस्कर की छोटी धरणे, असा एक प्रश्न दाभोलकरांनी चर्चेसाठी घेतला आहे. भारतात हंगामी पाऊस पडतो, ३–४ महिन्यांमध्ये बहुतेक पाऊस पडून जातो; देशातील भूपृष्ठावरून वाहणाऱ्या एकूण १८ कोटी हेक्टर मीटर पाण्यापैकी केवळ ६ कोटी ९० लाख हे. मी. पाणीच तेवढे वर्षभर साठवून आपण वापरू शकू, अशी माहिती पुरविण्यापासून दाभोलकर त्यांच्या युक्तिवादास आरंभ करतात. याच्या पुढचा युक्तिवाद कोणता तर, 'मनमानी करत या देशातील पाण्याला समुद्रात जाऊ देणे आपणाला परवडण्यासारखे नाही.' एक समग्र व्यवस्था म्हणून पृथ्वीला समजून घेण्याच्या संदर्भात नद्यांमधून वाहणारे पाणी मनमानी करीत समुद्राला जाऊन मिळते हे विधान घोर अज्ञान प्रकट करते. 'निसर्गाकडे म्हणजे काय ते पुन्हा एकदा पहावे लागेल' असे एक वाक्य टाकण्यापलीकडे दाभोलकर जात नाहीत. 'इकॉलॉजी' हे एक शास्त्र उदयास आले आहे. या शास्त्राच्या आधारे ते 'समजून घेताना' दिसत नाहीत. निसर्ग ही एकत्रित उत्क्रांत होत जाणारी गतिमान वैज्ञानिक व्यवस्था, तीही स्वयंनियंत्रित व्यवस्था आहे. निसर्गाकडे बारकाईने पाहिले तर असे दिसते की, मातीला धरून ठेवणारे, पाणी जमिनीत मुरण्यास मदत करणारे, पाऊसपाणी व हवामान यांना अनुरूप असे गवताळ, झुडुपाळ व घनदाट जंगलांचे आच्छादन निर्माण करण्याकडे निसर्गात सतत प्रयत्न असतो. म्हणजे, पावसाचे पाणी निसर्गाच्या व्यवस्थेत मनमानी करीत वाहू शकत नाही. पाणी मुरण्याची, वाहण्याची एक शिस्त निसर्गात आढळते. पावसाचे मान दरवर्षी सारखे नसणे, त्यात चढ-उतार असणे, वेळापत्रक बदलणे, हा निसर्गव्यवस्थेचा भाग आहे. पूर व अवर्षण हापण या व्यवस्थेचा एक अंगभूत भाग आहे. खरे तर, 'तुम्हाला विज्ञानयुगात जगायचय', व 'विज्ञानेश्वरी' या मथळ्याची पुस्तके लिहिणाऱ्या दाभोलकरांकडून अपेक्षा अशी की पाण्याच्या वाहण्यातील 'मनमानी' ही माणसाच्या अडाणी वा उद्धट हस्तक्षेपाचा, चुकीच्या भूमिकेतून व पद्धतीने निसर्गावर मात करण्याच्या प्रयत्नांचा परिणाम आहे यांची त्यांनी सर्वप्रथम दखल घ्यावी. बेसुमार जंगलतोड, अतिरेकी प्रमाणात गुराढोरांकडून, शेळ्यामेंढ्यांकडून चराई, जमीन नांगरटीच्या व शेतीच्या गैर पद्धती, नद्यांचे प्रवाह पूर्णपणे अडविणारी लहान-मोठी धरणे इत्यादी व्यवहारांमधून ही मनमानी निर्माण झाली आहे, यावर त्यांनी भर द्यायला हवा होता. ही जाण प्रकट केली असती तर ते सार्थपणे 'मनमानी न करता पडणाऱ्या पावसाच्या पाण्याची निसर्गाला अनुसरत सुयोग्य साठवण आपण कोठे कोठे कशी करू शकू व त्या पाण्याचा सुयोग्य कमाल वापर कसा करू शकू" हा प्रश्न उपस्थित करू शकले असते.

शेतीप्रमाणेच उद्योगधंद्यांसाठी, लोकांना पिण्यासाठी व घरगुती वापरासाठीपण पाण्याचे साठे आवश्यक असतात ही गोष्ट दाभोलकर अशा पद्धतीने सांगतात की मोठ्या धरणांना विरोध करणाऱ्यांना जणू याची कल्पनाच नाही वा त्यांना या उपयोगांविषयी पर्वाच नाही. प्रतिपक्षाला पूर्ण न्याय देऊन चर्चा करण्याचे









पथ्य न पाळण्याबद्दल पर्यावरणवादी मंडळींवर सरसकट टीका दाभोलकरांनी केली आहे. त्यांच्या टीकेत काही प्रमाणात तथ्य आहे ही गोष्ट खेदपूर्वक व नम्रभावाने स्वीकारली पाहिजे. पण मग स्वतः त्यांनी हे पथ्य जास्तच काटेकोरपणे पाळायला नको का ? पाण्याचे साठे करण्याची गरज इतरही कारणांसाठी आहे असे दाखवून दिले म्हणजे धरणांचे सरसकट समर्थन होते असे खात्रीनेच नाही. भारतातील मानवी वसतीची संरचना कशी असावी, लोकसंख्येचा विभागणीत व विखुरणीत समतोल कसा टिकेल, शहरांचे आकारमान काय असावे, हे सारे प्रश्न स्वतंत्रपणेच उपस्थित आहेत. पण आजच्या घडीला मोठी शहरे गृहीत धरून विचार करायला हरकत नाही. तीच गोष्ट उद्योगधंद्यांविषयीपण.

दाभोलकरांच्या पुस्तकात या विशिष्ट गरजा भागविण्यासाठी धरणे लागणार हे सांगण्यापलीकडे या मुद्द्यांची चर्चा येत नाही. नैसर्गिक संसाधनांवर सतत वाढता ताण पडत आहे. हा ताण एका मर्यादेपलीकडे वाढविणे परवडणारे नाही. वीज, पाणी, खनिजे वगैरे सर्वच बाबतीत काटकसरीने काटेकोरपणे वापर करून बचत करणे, जे संसाधन आपण वापरतो त्याचे पुरते मूल्य वापरणाऱ्यास चुकवावे लागणे, संसाधने समानतेने, न्याय्य प्रमाणात सर्वांना उपलब्ध होणे या गोष्टीचे महत्त्व पन्नास-साठ वर्षांपूर्वीपर्यंत एवढे नव्हते. लोकसंख्याही कमी होती आणि संसाधनांसाठीची मागणीही सीमित होती. आज या मुद्द्यांचे महत्त्व फार जास्त आहे. नवनवी धरणे बांधत जाण्याआधी याविषयीच्या सम्यक धोरणाची व उपायांची चर्चा करणे म्हणून अगत्याचे बनले आहे. अशा कोणत्याच चर्चेत खोलवर न जाता, भूमिका, धोरणे व उपाय स्पष्ट न करता दाभोलकर जेव्हा धरणांची आवश्यकता प्रतिपादतात तेव्हा ते डोळस दूरदृष्टीचा अभाव प्रकट करतात. धरणांची आवश्यकता मान्य केल्यावरही आजच्या भूमिकेत, धोरणांमध्ये व उपायांमध्ये आमूलाग्र बदल करण्याची नितान्त निकड आजच भारतातल्या सर्व प्रमुख शहरांमध्ये उत्पन्न झालेली आहे.

हवा, पाणी, जमीन, जंगल या फुकट उपलब्ध असणाऱ्या गोष्टी भासत असल्या तरी त्या वास्तविक अत्यंत मौल्यवान गोष्टी आहेत ही गोष्ट या गोष्टी खरेदी-विक्रीच्या आधुनिक आर्थिक व्यवहारांचा भाग बनल्या की स्पष्ट होते. त्यांची योग्य ती किंमत आधुनिक अर्थशास्त्रीय चौकटीतही ठरविणे अशक्य नाही. पाणी साठवणे, वाहून आणणे व ते पुरविणे यासाठी होणारा खर्च तेवढा आज आपण हिशेबात धरतो. पाण्याची किंमत शून्य धरलेली असते. ही अनर्थकारी भूमिका लौकरातलौकर सुधारून घेतली पाहिजे. पाण्याची टंचाई उत्पन्न झाली की लोक पाण्यासाठी जो भाव द्यायला तयार होतात त्यावरून पाणी किती किंमती आहे ते लक्षात येऊ शकते. जे पाणी खासगी मालकीचे त्यालाच तेवढी किंमत व जे नदीतून वाहते वा तळ्यात साठते त्याला काही किंमत नाही ? शेती, उद्योगधंदे, शहरांतील लोक, शहरांच्या इतर गरजा यांच्यासाठी माझ्या प्रवाहातले पाणी तुम्ही उचलणार म्हणता तर मला पुरती किंमत चुकवा असे नदी म्हणते आहे अशी कल्पना करणे योग्य होईल. डोक्यावर पडणारे पावसाचे पाणी, साठवून ठेवण्यासाठी येणारा खर्च, एकदा वापरून फेकून न देता ते शक्य तितक्या वेळा वेगवेगळ्या कामासाठी वापरण्याची व्यवस्था करण्यासाठी येणारा खर्च ही किफायतशीर गुंतवणूक वाटेल इतकी पाण्याची किंमत धरली जाण्याची निकड आहे. शहरे, उद्योगधंदे, शेती, घरगुती वापर यांची पाण्याची खरी गरज किती व स्वस्तात मिळतेय म्हणून होणारा उधळमाधळ वापर किती ते मग स्पष्ट होईल.

या पार्श्वभूमीवर पाहता, सरदार सरोवरासारखे प्रकल्प हाती घेणे म्हणजे उधळपट्टी करण्याची सवय जडलेल्या माणसाला आणखी बेपर्वा व उधळचा बनण्यास प्रोत्साहन देणारे, त्याचे लाड करीत राहणारे धोरण अंगिकारण्यासारखे ठरते. पर्यावरणीय विनाशाचा, असमतोल उत्पन्न होण्याचा मुद्दा नसता तरी, व्यवहारी शहाणपण व दूरदृष्टीच्या या पातळीवर भारतीय समाजाने काटकसरीची शिस्त लावून घेण्याची गरज स्पष्ट आहे.

× × ×

पूरनियंत्रणाच्या दृष्टीने धरणांचा एका मर्यादेपर्यंतच उपयोग होऊ शकतो. धरण पूर्ण भरेतोवर पाणी अडवून ठेवता येते. धरण भरल्यावरही पाऊस पडत राहिला तर पूर येणे थांबविता येत नाही. उलट, धरणातले पाणी सोडून धरणाला असलेला धोका टाळावा लागतो. यामुळे अचानक पुराचे संकट वाढते ('फ्लॅश फ्लड्स'). दाभोलकर जेव्हा, 'गंगा आणि ब्रह्मपुत्रा यांच्यावर अजून मोठी धरणे न बांधल्याने

तेथील पूर अजूनही सुरू आहेत ' असे विधान करतात तेव्हा धरणे नसली की पूर येतो असा वाचकांचा समज ते करून देतात. मुळात पूर आणि पाऊस यांचा अन्योन्य संबंध आहे. पडणारे पावसाचे पाणी जास्तीत जास्त प्रमाणात स्वतःच्या पोटात रिचविण्याची जमिनीची क्षमता हिरव्या आच्छादनामुळे पूर्णपणे टिकून होती अशा काळातही पूर–महापूर येत. जमिनीत पाणी मुरण्याचे प्रमाण वेगवेगळ्या कारणांनी कमी झाले की तेवढ्याच पावसाने पूर जास्त मोठा येतो. पावसाळ्यातही नद्या दुथडी भरून वाहणार नाहीत अशी व्यवस्था आम्ही धरणे बांधून करू अशी आपली प्रतिज्ञा असेल तर आपले वागणे मनमानी होईल. म्हणून पूर-महापूर यांचा प्रथम समग्र दृष्टीने विचार करण्याची गरज आहे. ही समग्र व सम्यक् दृष्टी दाभोलकरांच्या विवेचनात आढळत नाही.

जमिनीवरील पावसाच्या प्रकार-प्रमाणानुसार अनुरूप असे हिरवे आच्छादन निर्माण करून जास्तीत जास्त प्रमाणात मुरविण्याची व्यवस्था करून निसर्ग पूर नियंत्रित करीत असतो. चांगला पाऊस झाल्यावर नद्या दुथडी भरून वाहतात तेव्हा त्या निचऱ्याची ( ड्रेनेजची ), नद्यांची पात्रे गाळाने उथळ बनणार नाहीत अशीही दक्षता घेतात. जमिनी सुपीक करण्यातही पुराच्या पाण्याचे कार्य राहिले आहे. तेव्हा पूर-नियंत्रणाची योग्य पद्धत यच्चयावत पाणलोटक्षेत्रांची सुयोग्य पुनर्बांधणी करण्यास अग्रक्रम देईल. पावसाचे मान व प्रकार लक्षात घेऊन सर्व जमीन अनुरूप अशा जंगलांनी, कुरणांनी व शेतीने आच्छादित राहील हे पाहण्याचे महत्त्व ओळखेल. पूरनियंत्रणाची खरी चिंता असेल तर आपण शेतीच्या पद्धतींचा, विशेषतः नांगरटीचा व पिकांचाही, मुळातून फेरविचार करू. नद्यांची पात्रे पावसाळ्यात काही दिवस भरून वाहण्याचेही कार्य पार पडेल अशा पद्धतीनेच नंतरही पूर–महापूर ' नियंत्रित ' केले पाहिजेत हे पथ्य स्वीकारील.

आज पूर इतके विध्वंसक रूप चटकन का धारण करतात याचाही विचार व्हायला हवा. तोही दाभोलकर करीत नाहीत. पावसाचे पाणी पोटात पुरेपूर साठवून ठेवण्याची जमिनीची क्षमता आपण गेल्या शे-दीडशे वर्षांमध्ये, व विशेषतः गेल्या चाळीस वर्षांमध्ये, सतत कमी करीत आणली असल्याचा यात भाग किती ? धरणे बांधली आहेत, बांध घातले आहेत, आता आपण नद्यांना येणाऱ्या पुरांचा प्रश्न सोडवला आहे असे समजून पूररेषेच्या आतही आपण वस्ती करू लागलो आहोत, पूररेषेची पर्वा न करता शहरे वाढू देत आहोत, यांचा भाग किती ? आणि पूर-महापूर या नैसर्गिक आपत्तींशी जुळवून घेऊन राहण्याची लवचिकता गमावली आहे तिचा भाग किती ? पुराने खेडी, शहरे उद्‌ध्वस्त होऊ नयेत अशी व्यवस्था जरूर करायला हवी. पूर येण्याचेच कायमचे बंद करून आपण ती व्यवस्था केलेली आहे वा आता करणार आहोत ही ' वैज्ञानिक आंधळी समजूत ' आहे. महापूर नावाची कधी कधी अडणारी गोष्ट राहणार व त्या वेळी धरणेही अपुरी पडणार. पाणी अडेल, जिरेल याची आपण जेवढी चोख व्यवस्था प्रत्येक पाणलोटक्षेत्रात शेती, जंगल व बांधबंदिस्ती या तिन्ही प्रकारे करू तितका पुराने घडून येणाऱ्या विध्वंसाचा आपण पक्का बंदोबस्त करू शकू. याउलट, केवळ मोठ्या धरणांच्या भरवशावर राहू तितके देशाच्या अनेक भागांमध्ये पुरांची विध्वंसकता अधिक उग्र होत जाईल अशीच शक्यता आहे.

× × ×

धरणे, त्यांतही मोठी धरणे अवर्षणावर कायमची व पूर्ण मात करू शकतात हीपण अशीच ' वैज्ञानिक आंधळी समजूत ' आहे. धरणाच्या भिंतीआड साठणारे पाणी अखेरीस पावसाचे (वा डोंगरमाथ्यावर पडलेल्या हिमापासूनचे ) असते. ज्या पाणलोटक्षेत्रातले पाणी धरणात येते त्या पाणलोटक्षेत्रात जर सतत दोन-तीन वर्षे अवर्षण पडले वा एखाद्या वर्षी फार तीव्र अवर्षण पडले तर धरणात पाणी त्या प्रमाणात कमीच साठते. मोठ्या नद्यांवरील मोठ्या धरणांच्या बाबतीत या नियमाला अपवाद खरोखर होतो का ? खरे तर, आपला भरवसा एका गोष्टीवर असतो. मोठ्या नदीच्या विस्तीर्ण पाणलोटक्षेत्रात कोठे ना कोठे तरी भरपूर पाऊस होईल अशी खात्री आपणास वाटते. असा पाऊस होऊन एकदा धरण भरले की आपले काम झाले अशी भूमिका असते. हा भरवसा खोटा ठरेल त्या त्या वेळी धरण भरावयाचे राहून जाईल. धरणे पूर्ण भरली नाहीत असा अनुभव आपणास अधूनमधून अलीकडे येत आहे. पण अवर्षणाच्या वर्षीही सरदार सरोवर धरण भरेल असे गृहीत धरून आपण विचार करू. सरदार सरोवराचे पाणी कालव्याच्या जाळ्याद्वारे कोठे कोठे पोचेल त्याचा

नकाशा पाहिला तरी लक्षात येते की गुजरातचाही बराच मोठा भाग तसाच राहतो. तसेच पाणी-संग्रहण ( कॅचमेंट ) क्षेत्रातही कालव्याचे पाणी पोचत नाही. याचा अर्थ काय ? धरणात पाणी भरले की एका विशिष्ट प्रदेशातील अवर्षणावर मात करता येते असे निश्चितच म्हणता येईल. पण अवर्षणावर सर्वत्र मात आपण केली असे होत नाही. पण धरणांचे समर्थक ज्या प्रकारे युक्तिवाद करतात त्यावरून मात्र अशी समजूत निर्माण होते व रुजते. ही समजूत भल्या भल्या शेती व जलसिंचन तज्ज्ञांच्या ठायी धरणासंबंधी एक आंधळा विश्वास पैदा करीत असली पाहिजे. अवर्षणावरील सर्वत्र परिणामकारक ठरेल अशी संरक्षक उपाययोजना ही पावसाच्या कमी-जास्त होणाऱ्या प्रमाणाचा कमीत कमी आघात होईल अशा प्रकारची शेती, पिकांची निवड, जमिनीच्या पाणीधारणक्षमतेचे रक्षण/संवर्धन, हिरव्या आच्छादनाची जपणूक यांद्वाराच करायला हवी; अवर्षणावर पायाभूत व प्राणभूत उपाययोजना ही पाणलोटक्षेत्राची सुयोग्य बांधणी व विकास हीच आहे याकडे एरवी इतके दुर्लक्ष कसे काय झाले असते ? पावसाचे कमी-अधिक होणारे मान, पावसाचा एकंदर आकृतिबंध ध्यानात घेऊन जमिनीच्या मगदुरा व ठेवणीनुसार विविध प्रजातींची (व्हरायटी) चोखंदळ निवड व वापर करण्याचे स्थानिक पातळीवरील लोकांमध्ये मुरलेले मौलिक शहाणपण शेतीच्या आधुनिकीकरणाच्या ओघात एरवी कसे उपेक्षिले गेले असते ?

अवर्षणावर काबू प्रस्थापित करण्याची चिंता खरी असेल तर अधिक अल्पमोली व बहुगुणी उपाययोजना कोणती ? मोठी धरणे बांधणे ही, की पाणलोटक्षेत्राचा व सम्यक व समग्र विकास करणे ही ? आपण धरणांवर विसंबतो तेव्हा अवर्षणाचा प्रश्न सर्वांसाठी सोडविण्याची जबाबदारी आपण झटकून टाकतो; आवडती व नावडती अशी विभागणी केली जाते.

× × ×

छोटी धरणे हा मोठ्या व मध्यम धरणांना पर्याय होऊ शकतो का ? छोट्या धरणांविरुद्धचा केंद्रीय जल-आयोगाचा अधिकृत युक्तिवाद दाभोलकरांनी सादर केला आहे. तो वेगवेगळ्या अंगांनी तपासून पाहिलेला नाही. आंध्रचे उदाहरण देऊन ते म्हणतात की तीन वर्षे सतत अवर्षण होते त्या काळात मध्यम व मोठ्या धरणांच्या जलसिंचन क्षमतेवर फारसा परिणाम झाला नाही पण छोट्या धरणयोजनांची क्षमता १७ लाख हेक्टर असून फक्त ६० हजार हेक्टर जमिनीला सिंचित करता आले. ही सरकारी माहिती खरी आहे असे धरूया. पहिला मुद्दा असा की, वरील युक्तिवादाच्या संदर्भात, लागोपाठ अवर्षण आंध्रच्या कोणकोणत्या भागांमध्ये होते व मध्यम व मोठी धरणे कोणत्या नद्यांवर, कोणत्या भागातली होती ? ज्या प्रदेशात पाऊस पडल्याने विशिष्ट, मध्यम व मोठ्या धरणांमध्ये पाणी साठले त्या प्रदेशांतल्या छोट्या धरणांशीच वास्तविक तुलना व्हायला हवी. समर्थनार्थ जी तुलना दाभोलकर आधाराला घेतात ती अवैध व गैर आहे. दुसरा मुद्दा असा, की ज्या छोट्या धरणांच्या बाबतीत ते ( १७ लाख हेक्टर क्षमता तर केवळ ६० हजार हेक्टर सिंचन ) अशी तीव्र तफावत समोर ठेवतात त्या क्षेत्रांमध्ये पर्यायी मध्यम वा मोठी धरणे आधी बांधलेली असती तर ही पाळी आली नसती असे दाखवून देणे आवश्यक आहे. सरदार सरोवराच्या बाबतीतही आपण काय करू पाहात आहोत हे लक्षात घ्या. गुजरातमधील नद्यांवर छोटी धरणे काम देत नाहीत म्हणून मध्यम व मोठी धरणे बांधण्याची योजना आपण आखत नाही. आपण या सर्व नद्यांच्या खोऱ्यांबाहेरील एक नदी घेऊन तिच्यावर अजस्र धरण बांधायचे म्हणतो आहोत. नर्मदेच्या खोऱ्यात येणाऱ्या जमिनींना सुयोग्य स्वरूपात व प्रमाणात सिंचनासाठी पाणीपुरवठा करण्यासाठी सरदार सरोवर वा नर्मदासागर ही दोन महाधरणेच बांधली पाहिजेत असे खरोखर सिद्ध करीत नाही. तिसरा मुद्दा असा की, छोट्या धरणयोजना जर अपर्याप्त असतील तर ज्या क्षेत्रांना त्यांच्या द्वारे पाणी पुरवले जाते त्या क्षेत्रांचा प्रश्न सोडविण्याच्या वैकल्पिक योजना शोधल्या पाहिजेत. वेगळ्या जागी व दुसऱ्याच नद्यांच्या खोऱ्यांत मध्यम व मोठी धरणे बांधून तिसऱ्याच क्षेत्रातील जमीन ओलिताखाली आणणे हा खरा उपाय नव्हे.

छोटी धरणे प्रथमदर्शनी आकर्षक वाटली तरी सगळा हिशेब मांडल्यावर बुडणाऱ्या जमिनींचे एकंदर क्षेत्र जास्त मोठे येते व विस्थापितही जास्त लोक होतात असा युक्तिवाद करून गुजरातमधील हेरान धरणाचे उदाहरण दाभोलकरांनी दिले आहे. दाभोलकरांना मिळालेली माहिती खरी आहे असे धरून चालू. जे प्रश्न चिकित्सक अभ्यासकाच्या भूमिकेतून त्यांनी










उपस्थित करायला हवे होते ते इथेही केलेले नाहीत. पर्यावरणवाद्यांनी सुचविलेली छोटी धरणे व पाटबंधारे खात्याचे व हेरान धरण यांचे लाभक्षेत्र एकच आहे का ? ते एकच नसण्याची शक्यता अशी. ते असो. शेतीला पाणीपुरवठा करायचा असो वा शहरे-उद्योगधंद्यांना सुरुवात कोठून करावयास हवी ? कोठे भिंत बांधली असता जास्तीतजास्त पाणी साठेल ? हा आरंभ-बिंदू सामान्यतः असतो, पण हे गैर आहे. अमुक क्षेत्रातील शेतीला वा खेड्यांना वा अमुक उद्योगधंद्यांना वा अमुक शहराला पाणीपुरवठा करण्याच्या वेगवेगळ्या पर्यायी योजना कोणत्या होऊ शकतात व त्यांतून कोणती उपाययोजना कोणत्या कारणांनी निवडावी ? इथून सुरुवात व्हायला हवी. हेरान धरणाचेच उदाहरण घ्यायचे तर दाभोलकरांनी व पर्यावरणवादी, दोघांनीही पुढचा प्रश्न वास्तविक उपस्थित करावयास हवा : ज्या क्षेत्रातील जमिनींना पाणी पुरविण्यासाठी हेरान धरणाची योजना आहे त्या क्षेत्रातल्या जमिनींना सुयोग्य पाणीपुरवठा करण्याची हीच एकमेव योजना व हीच सर्वोत्तम योजना आहे काय ? या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी आणखी काही प्रश्न विचारावे लागतात. ( जमिनीचा प्रकार कोणता, पिके कोणती, हवामान व पाऊसपाणी यांचा आकृतिबंध कोणता हे लक्षात घेऊन ) पाणीपुरवठा कोणत्या स्वरूपाचा हवा, पाणीपुरवठा करून नेमकी कोणती उद्दिष्टे साध्य करावयाची आहेत, आणि ही उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने राजकीय, आर्थिक व सामाजिक-सांस्कृतिक परिमाणे ध्यानात घेता कोणती उपाययोजना सर्वोत्तम म्हणता येईल ? कोणत्याही क्षेत्रातील आंशिक भागा-सच पाणीपुरवठा करणारी धरण-कालवे योजना ही मुळातच निकृष्ट उपाययोजना आहे. ती केवळ आपद्-धर्म म्हणून स्वीकारणेच योग्य ठरेल. दुसरी गोष्ट अशी की, अन्नधान्याचे उत्पादन हे जर सर्वप्रथम उद्दिष्ट राखणे योग्य असेल तर प्रत्येक गाव अन्नधान्याच्या उत्पादनाच्या बाबतीत स्वावलंबी बनेल, व पिण्याच्या-घरगुती वापराच्या पाण्यासाठीही गाव स्वाश्रयी बनेल. या पैलूंनाही विशेष महत्त्व प्राप्त होते. समग्र पाणलोट -विकास व छोटे बंधारे, छोटी धरणे यांना मोठे धरण हा मग पर्याय होऊ शकत नाही. जमीन जास्त बुडेल, विस्थापितही जास्त संख्येने होतील, त्याचे काय ? या प्रश्नाचे उत्तर दुहेरी आहे. बुडणाऱ्या जमिनींवरील पाणी ओसरल्यावर एक पीक घेतले जाऊ शकते. विस्थापित व लाभधारक एकाच गावातील पंचक्रोशी-तील असल्याने लाभधारकांमध्ये विस्थापितांना सहभागी करून घेण्याची जबाबदारी समाधानकारक रीत्या पार पाडली जाऊ शकते. विस्थापित व लाभधारक हे भाऊबंदच असतात. संरक्षक जलसिंचन हे जर मुख्य उद्दिष्ट असेल तर पाण्याचा साठा फार मोठा असण्याची गरजही नसेल. फेब्रुवारीपर्यंत पाणी राहिले तरी काम होऊन जाईल. सामान्य अवर्षणांच्या वर्षांमध्येही हा पर्यायी नमुना उत्तम काम देतो हे राळेगणसिद्धी-सारख्या उदाहरणांनी दाखवून दिले आहे.

छोट्या धरणांमध्ये मुळात पाणी कमी साठते. त्यातले बरेच पाणी बाष्पीभवन होऊन हवेत उडून जाते. छोट्या धरणांचा हा मोठा दोष म्हणून सांगितला जातो. एकंदर साठवलेले पाणी व वाफ होऊन उडून जाणारे पाणी यांच्यातल्या प्रमाणाच्या दृष्टीने विचार करता एकाच जागी प्रचंड मोठा जलाशय निर्माण करणे अधिक श्रेयस्कर हा युक्तिवाद बिनतोड ठरतो.

बारमाही बागाईत करण्याचे उद्दिष्टच मुख्य उद्दिष्ट मानले नाही तर ? बाष्पीभवनाचा मुद्दा फेब्रुवारीनंतर अधिक तीव्र बनत जातो. पाझर तलाव, छोटे बंधारे, छोटी धरणे मुख्यतः संरक्षक जल-सिंचनासाठी वा विहिरींचे पाणी वाढविण्यासाठीच असतात. त्यांचे महत्त्व आपण वर पाहिलेच आहे. एका विशिष्ट संदर्भात बिनतोड ठरणारा युक्तिवाद-संदर्भ बदलला की बराचसा अप्रस्तुत ठरतो.

बाष्पीभवनाने हवेतील आर्द्रता वाढते. ज्या ज्या जमिनींवर चांगले वृक्षाच्छादन असते तेथेही पाण्याचे बाष्पीभवन ( इव्हॅपोट्रॅन्स्पिरेशन ) सतत चालूच असते. हे बाष्पीभवन जलसिंचित पिके व जमिनी यांच्यामधूनही होतच असते. पाण्याची वाफ होणे म्हणजे पाणी वाया जाणे असे समजावयाचे का ? निसर्गाच्या व्यवस्थेत चक्रे असतात. चक्रीय अन्योन्यसंबंध जाणून घेण्याचे महत्त्व असते. माणसे, पिके, गुरे, जंगले यांच्या दृष्टीने हवेतील आर्द्रता महत्त्वाची नसतेच का ? हवामान व पाऊसपाणी या दृष्टीनेही आर्द्रतेचे महत्त्व असते. काही पिके दंवावर येणारी असतात. रब्बीच्या हंगामातील पिकांना दंवाचे महत्त्व असते. छोट्या धरणांमधून जास्त पाणी वाफ होऊन हवेत उडून



अनुक्रमणिका

जाते हे वाचून एकदम बिचकून जाण्याचे कारण नाही.

× × ×

मोठ्या धरणामुळे एका सलग मोठ्या प्रदेशात बारमाही पाणीपुरवठा उपलब्ध झाल्याने त्या सर्व टापूत शेती-समृद्धी होते व अशी शेती कृषि-औद्योगिक क्रांतीला चालना देते; सबब मोठी धरणे होणे अगत्याचे आहे, असा युक्तिवाद दाभोलकर करतात. यात काही सामाजिक अन्याय, विषमता वाढीला चालना आहे हे ते लिहून ठेवतात. पंजाब-हरयाणाचे उदाहरण देतात.

विभागीय असमतोल, न्याय-अन्याय, विषमता या अशा गौण महत्त्वाच्या बाबी मानावयाच्या हे कितपत उचित आहे ? विशेषतः भुकेलेल्या अवस्थेतील तीस कोटी लोकांची कणव व त्यांच्या अन्नधान्याच्या गरजेची प्राथमिकता हा मुद्दा पर्यावरणवाद्यांना झोडपण्यासाठी वापरीत असताना असे गौण स्थान कसे देता येईल ?

विस्तीर्ण प्रदेशात बारमाही बागाईत पिके घेण्याची कल्पना ही शेती व पाणी यांचा संबंध उरफाट्या स्वरूपात पाहणारी व प्रस्थापित करणारी आहे. निसर्गात जमिनीची सुपीकता कायम टिकवून ठेवण्याची रीत कोणती, तसेच सुपीकता निर्माण करणारे विभिन्न घटक व त्यांच्यातील अन्योन्यसंबंध कोणते हा प्रश्न येथे महत्त्वाचा ठरतो योग्य प्रमाणात योग्य वेळी पाणी उपलब्ध असेल तर शेतीचे उत्पादन काही पटींनी वाढते ही गोष्ट जेवढी खरी तेवढीच पाण्याच्या चुकीच्या पुरवठ्याने जमिनी खराब होतात ही गोष्टही निर्विवाद. असेही दिसते की कडक उन्हाळी प्रदेशांमध्ये उन्हाळ्यात बागाईत पीक घेण्याने जमिनींना मीठ फुटण्याचा धोका वाढतो. तर काही जमिनी चटकन पाणथळ बनण्याचा धोका असल्याने पाणी अशा जमिनींमध्ये अतिप्रमाणात पोचणार नाही याची दक्षता घ्यावी लागते. जलसिंचन-प्रकल्पांच्या खाली येणाऱ्या जमिनी फार मोठ्या प्रमाणावर खराब झालेल्या आहेत. बारमाही ओलिताचे सरसकट स्वप्न रंगविणे व लोकांना स्वप्नाच्या भ्रमजालात गुरफटून टाकणे असमंजसपणाचे आहे. पण आजवर आपले जलसिंचन धोरण नेमके हेच करीत आले आहे. जितके मोठे धरण तितके बारमाही पाणीपुरवठ्याचे आमिष व आश्वासन जास्त; किंबहुना बारमाही पाणीपुरवठा करण्याची मोठी क्षमता हाच समर्थनपर मुख्य युक्तिवाद असतो.

बारमाही बागाईतीचे मोठे प्रकल्प केवळ असमतोल व विषमता वाढवितात असे नाही. प्राथमिक पोषणाच्या दृष्टीने सर्वसामान्य गोरगरीब जनतेच्या गरजा भागविण्याच्या आड हे प्रकल्प येतात. पाणी स्वस्त व मुबलक उपलब्ध होणार म्हटल्यावर दुर्मीळ संसाधनांचा कमाल उत्पादक वापर कोणता असा विचार न होता कोणत्या पिकाने भरपूर पैसा मिळतो हे पाहण्याकडे प्रवृत्ती होते. अशी पिके गोरगरिबांची गरज भागविणारी असतातच असा अनुभव नाही. सरदार सरोवराचे उदाहरण घेतले तरी आपणास स्थिती काय आढळते ? जमिनी खराब होण्याइतक्या प्रमाणात पाणीपुरवठा होणार हे गृहीत धरून निचऱ्यासाठी विहिरी खोदण्याची व कालवे व विहिरी यांच्या संयुक्त वापराची योजना बनविलेली आहे. पाणी पुरविण्याची पद्धती व पाण्याची विशिष्ट स्वरूपाची अतिरिक्त उपलब्धता यांच्यामुळे, कागदावर काहीही म्हटलेले असले तरी, प्रत्यक्षात तात्कालिक नफेखोरीच्या संकुचित दृष्टीने पाण्याचा वापर केला जाणे रोखून धरता येणे अशक्य जाईल हे आपण आजवरच्या पूर्वानुभवांवरून व राजकीय-आर्थिक सत्तेच्या आजच्या चित्राच्या आधारे सांगू शकतो.

मोठ्या, सलग प्रदेशातील शेती समृद्ध होऊन कृषि-औद्योगिक क्रांती शक्य होते या मुद्द्याकडे वळूया. सरदार सरोवर प्रकल्पावर जो खर्च होणार आहे तो पैसा गुजरातमधील पाणलोटक्षेत्रांच्या विकासावर खर्च केला तर, धरणाखाली भिजणाऱ्या क्षेत्राच्या तुलनेने काही पटींनी मोठे इतके क्षेत्र समृद्ध होईल. जंगलातील उपज, पशुधन, शेतीतली पिके यांच्या आधारे खरे कृषि-औद्योगिकीकरण शक्य होईल. ( पंजाब-हरयाणातले किती उद्योग वास्तविक अर्थाने कृषि-औद्योगिक आहेत? ) शेतीतल्या अशा कितीतरी अधिक विस्तीर्ण क्षेत्रातील लोकांची क्रयशक्ती वाढल्यावर त्यांच्या दैनंदिन गरजांभोवतीही उद्योग-व्यवसाय वाढतील.

तेव्हा, एक तर, कृषि-औद्योगिक क्रांतीसाठी बारमाही पाणीपुरवठा व मोठी धरणे आवश्यक आहेत हे खरे नाही. दुसरी गोष्ट, आर्थिक-सामाजिक–राजकीय असमतोल सांस्कृतिक–नैतिक ऱ्हास न होता क्रांती हवी


अनुक्रमणिका

असेल तर वास्तविक मोठ्या धरणांद्वारे ' कालव्यांनी बारमाही पाणीपुरवठा ' या पॅटर्नचाच फेरविचार व्हायला हवा. ' मुबलक ' पाणी उपलब्ध करून देण्यावर आधारलेले जलसिंचन ही जलसिंचनाची रीत अप्रगल्भ व आत्मघातकी रीत आहे. मोठ्या, अजस्र धरणांचे व कालव्यांचे बांधकाम अभियांत्रिकीच्या संकुचित तांत्रिक परिप्रेक्ष्यामध्ये एक प्रगल्भ आव्हान असेल, व हे आव्हान भारतीय अभियंते स्वतःच्या हिमतीवर पेलू शकतात या दोन्ही गोष्टी मान्य होण्यात काहीच अडचण नाही. पण शेती व पाणीपुरवठा या संदर्भात आपण असे म्हणूया की या विशिष्ट स्वरूपात अभियांत्रिकी प्रगल्भता व कर्तृत्व प्रकट करण्याची गरज नाही. इथे ती विकृती ठरेल, व ठरत आहेच.

× × ×

जमिनी पाणथळ बनणार नाहीत किंवा जमिनींना मीठ फुटणार नाही याचा योग्य बंदोबस्त आपण आजवरच्या प्रकल्पांमध्ये करू शकलो नाही हे मान्य करून दाभोलकर असे आश्वासन देतात, की सरदार सरोवर व नर्मदासागर यांच्या बाबतीत मात्र पुरता ( अगदी फुल प्रूफ ) बंदोबस्त आपण केला आहे. कागदावरील योजना काय आहे ते दाभोलकर आपल्याला सांगतात. पाण्याचा निचरा होणे किती महत्त्वाचे असते हे आधीच्या जलसिंचन प्रकल्पाधिकाऱ्यांना व शेतकी तज्ज्ञांना माहीत नव्हते व म्हणून त्यांनी केवळ धरणे बांधून कालव्यांनी पाणी खेळविण्याचीच व्यवस्था केली असे म्हणावयाचे का ? तशी जर परिस्थिती नसेल तर मग जमिनी पाणथळ बनत राहिल्या, त्यांना मीठ फुटत राहिले असे का घडले त्याची चिकित्सा करणे आवश्यक ठरते. जमिनीच्या प्रकारामुळे वा रचनेमुळे पाण्याचा निचरा जेथे सहजासहजी होत नाही वा जेथे पाण्याच्या बाष्पीभवनामुळे जमिनींना मीठ फुटण्याचा धोका मोठा आहे अशा ठिकाणी फार अवडंबरपूर्ण व्यवस्था करणे अनिवार्य ठरेल. अशा प्रकारे सिंचन न करणे ही पायाभूत आवश्यकता मानायला हवी. निचऱ्याची किती आदर्श रचना आम्ही केलीय म्हणून जे वर्णन सरदार सरोवराच्या बाबतीत सरकारी पातळीवरून केले जात आहे ते वर्णनच असे दाखवून देते की सरदार सरोवरासारखा सिंचन-प्रकल्प त्या भागात उपयोगाचा नाही; तो अतिशय धोक्याचा आहे. जमिनी धोक्यात येतील अशा स्वरूपाचा जलसिंचन-प्रकल्प राबवायचा आणि तो धोका टाळण्यासाठी मग अशी गुंतागुंतीची उपाययोजना सुचवावयाची की जी उपाययोजना चोख राबविली जाण्याची शक्यता अगदी शंकास्पद आहे हा अव्यापारेषु व्यापार नव्हे का, असा प्रश्न उपस्थित करावयास नको का ?

सरदार सरोवरप्रकल्पामुळे १७–१९ लाख हेक्टर जमीन ओलिताखाली येणार व त्यामानाने जलाशयात बुडणारी जमीन नगण्य वाटावी इतकी कमी आहे हा युक्तिवाद दाभोलकरांनी सादर केला आहेच. बुडणारे जंगलही निकृष्ट प्रतीचेच आजच्या घडीला तरी आहे, असे म्हटले की विरोध अविवेकी व अदूरदर्शी वाटतो. पण ज्या प्रदेशांतून पाणी जाणार आहे त्यांपैकी वास्तविक किती भागांमध्ये या प्रकारच्या कालव्यांद्वारा सिंचनाची व्यवस्था धोका निर्माण करणारी नाही असा प्रश्न विचारायला हवा. मोठ्या आकड्याने दिपून जाण्याचे कारण नाही. जमीन, पाऊसपाणी व हवामान यांना साजेशी पिके खात्रीने घेण्यासाठी सीमित स्वरूपातले सिंचन हे पर्याप्त असले व अशा सिंचनासाठी पाणी उपलब्ध करून देण्यासाठीदेखील नर्मदेवरच धरण बांधायला हवे असे सिद्ध झाले तर विचार करता येईल. पण मग सरदार सरोवराचे आजचे आकारमान अनावश्यक ठरेल. कदाचित त्या धरणाचा खर्च मग न परवडणारा ठरेल.

धरणाची जागा निवडताना नदीचा प्रवाह पूर्णपणे अडवून मोठ्यात मोठा जलाशय निर्माण कोठे व कसा करता येईल असा प्रथम विचार होतो. मग हे पाणी गुरुत्वाकर्षणाच्या योगे कालव्यांद्वारे कोठे कोठे पुरविता येईल ती रेषा आखून किती क्षेत्र भिजेल ते पाहावयाचे, आणि त्या लाभक्षेत्राच्या आकारमानाच्या आधारे धरणाचे समर्थन करावयाचे हा सारा प्रकारच उरफाट्या भूमिकेचा निदर्शक आहे. जमीन, पिके, लोक यांची गरज, क्षमता यांचा विचार प्रथम असावयास पाहिजे ना ? पाण्याचा साठा व त्याचे वितरण हा एका चौकटीत अभियांत्रिकी प्रश्न आहे. पण जलसिंचन, शेती, भरण-पोषण या गोष्टींना इतर परिमाणे आहेत. ही परिमाणे अधिक महत्त्वाची आहेत. अभियांत्रिकी पैलू हा गौण आहे. जलसिंचन खाते (मग ते लहान बंधारे असोत की महा-धरणे असोत), (बांधकाम) अभियंत्यांच्या हाती देण्यातून गौण पैलूच सर्वांत वरचढ होऊन बसला आहे. आकारमानाने मोठी, तांत्रिक दृष्ट्या गुंतागुंतीची, नव्या

प्रकारची धरणे बांधण्यात विशेष पुरुषार्थ प्रकट होतो असे मग या अभियंत्यांचे मानस आढळत असेल तर नवल नाही.

× × ×

धरणाच्या भिंतीच्या आड अपेक्षेपेक्षा जास्त वेगाने व प्रमाणात गाळ साचून धरणांचे आयुष्य कमी होते की नाही ? या कारणाने सरदार सरोवर व नर्मदासागर यांचे आयुष्य कमी होण्याचा धोका कितपत आहे ? या मुद्द्यावरून पर्यावरणवाद्यांचा, व विशेषतः बाबा आमटे यांचा, युक्तिवाद किती कच्चा आहे हे दाखवून देण्याचे काम आपण कसे छान केले आहे असे दाभोलकरांना वाटत असणार. त्यांच्या लेखनाचा तो सूर आहे.

अपेक्षेपेक्षा, अंदाजापेक्षा पुष्कळ अधिक वेगाने/प्रमाणात गाळ साचून पाणी साठवून ठेवण्याची अनेकानेक धरणांची क्षमता कमी होत आहे. व ही गंभीर समस्या आहे हे सरकारी अहवालच म्हणतात. गाळ साचण्याचे प्रमाण अंदाजापेक्षा पुष्कळ जास्त असले तरी मोठ्या धरणांचे आयुष्य शंभर वर्षे नाही तर पुष्कळ जास्त राहणार आहे असा दिलासा दाभोलकर देतात. आता आपण मोठमोठे दरवाजे बसवून, हवे तेव्हा 'आवर्तीक्षमते'च्या भागातले पाणी हवे तेव्हा सोडून धरणातला गाळ काढून टाकण्याची पण सोय करीत आहोत, व यामुळे गाळाने धरण भरण्याचा प्रश्न आपण कायमचा सोडवला आहे असेही आश्वासन ते देतात. मोठ्या धरणांना, विशेषतः सरदार सरोवर व नर्मदासागर या धरणांना विरोध करणाऱ्यांच्या भूमिकेतला हा विशिष्ट युक्तिवाद गौण युक्तिवाद आहे. तो दुबळा आहे हे मान्य करायला हवे. गाळाने धरण भरण्याचा धोका छोट्या धरणांच्या बाबतीतही तेवढाच असू शकतो हे वेगळेच.

पण पर्यावरणवादी विरोधकांचा अति उत्साह जसा, तसा दाभोलकरांचाही अति उत्साह जाणवतो. नर्मदा प्रकल्पाच्या विभिन्न अंगांविषयी, संबंधित मुद्द्यांविषयी वेगवेगळ्या संस्थांकडून अभ्यास करवून घेतले आहेत व ते अहवाल सर्वांना कसे उपलब्ध आहेत त्याचे वर्णन ते करतात. पण 'त्यांतील १-२ संदर्भ सोडलेली वाक्ये सांगून हाहाकार माजवणार नाही एवढी खात्री पटवलीत तर आपणास सर्व अहवाल पाहावयास मिळतात' असे त्यांना लिहावे लागते. अशा अहवालांविषयी कठोरपणे आक्षेप घेण्यास हरकत कोणाची व का असावी ? कोणी संदर्भ सोडून आक्षेप घेतले तर खुलासा करता येतो, उत्तरे देता येतात. ज्या प्रकारचा विवाद नर्मदेवरील धरणे वा टिहरी धरण यांच्याविषयी आहे तो लक्षात घेता विरोधक काटेकोर चिकित्सक दृष्टीने अहवालांची परीक्षा करणार हे उदार मनाने गृहीतच धरावयास हवे. भले भले तज्ज्ञ गृहस्थ, समित्या, व्यावसायिक संघ किती निराधार, जुजबी व भोंगळ अहवाल सरकारला हवे तसे सादर करतात याचा अनुभव आपणास आहे. तेव्हा अहवालांचे अस्तित्व पुरेसे मानता येत नाही. अहवालांची अंमलबजावणी कितपत चोख होते हा पुढचा मुद्दा पूर्ण शिल्लक राहतोच. अनेक अभ्यास-अहवाल मान्यवर संस्थांनी वा व्यक्तींनी केलें आहेत एवढ्याने दाभोलकरांनी स्वतःचे व इतरांचेही समाधान करून घ्यावे हा अति उत्साह तेवढाच पक्षपाती नाही का ?

धरणात साचणारा गाळ वरचेवर काढून टाकण्याची व्यवस्था झाली असे समजू. जलसंग्रहण क्षेत्राचा ऱ्हास ही स्वतंत्रपणे नुकसानकारक गोष्ट आहे. सरदार सरोवर/नर्मदासागर यांसारख्या महाधरणांच्या बाबतीत हे क्षेत्र फार विस्तीर्ण असते. तसाच विचार केला तर, धरण बांधावयाचे असो वा नसो, या सर्व पाणलोटक्षेत्रांची योग्य बांधणी हा एरवीच काटेकोरपणे पार पाडायला हवा असा कार्यक्रम आहे. धरणात पाणी साठायला आरंभ व्हायच्या क्षणी खरे तर या कार्यक्रमाची राबवणूक पूर्ण झालेली असायला हवी.

धरण बांधण्याच्या बाजूचे जे लोक असतील त्यांनी कोणता आग्रह धरलेला दिसायला हवा ? दाभोलकरांप्रमाणे आपण जर असे म्हटले की, 'धरणात जाणाऱ्या गाळाचा वेग प्रथम जास्त असतो. नंतर एकदा जमिनीची धूप झाली की तो वेग पुढे कमी होत जातो हेपण मान्य होते' तर एक बेपर्वाईची भूमिका तयार होते. त्यातच, दरवाजे बसविले असल्याने गाळ काढून टाकता येणार आहे असे आश्वासन मिळाले की बेपर्वाई आणखी वाढण्याचीच शक्यता. म्हणून आग्रह असा असायला हवा की, जलसंग्रहण क्षेत्राची बांधणी समाधानकारकपणे झालीय असे प्रमाणपत्र स्वतंत्र यंत्रणेकडून प्राप्त होईतोवर धरणात पाणी साठविता येणार नाही ही शर्त असेल. आजवरच्या शेकडो-हजारो

धरणांपैकी एका तरी धरणाच्या संदर्भात हे काम झाल्याचे उदाहरण सापडते का ?

शासकीय यंत्रणेची बेपर्वाई, तिचा खोटारडेपणा, शासकीय अधिकारी-कर्मचारी यांची संवेदनशून्यता, त्यांना जाब विचारून, जबाबदार धरून भरपाई करावयास लावण्याच्या दंडकाचा अभाव या सगळ्या कारणांमुळे कागदावरच्या योजनांइतकेच चोख अंमलबजावणीसाठी प्रतिबंधक/नियंत्रक शर्तींचे महत्त्व प्रतिपादण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. याचे कोणतेच भान दाभोलकर दाखवीत नाहीत.

× × ×

प्रकल्पावर होणारा खर्च व त्यापासून होणारे लाभ यांचे काहीएक प्रमाण आहे असे दाखविता आल्याशिवाय प्रकल्प हाती घ्यावयाचा नाही हे बंधन औपचारिक स्वरूपाचे आहे. ब्रिटिश राजवटीच्या काळात ही शर्त का घातली गेली याला एक इतिहास आहे. दुष्काळनिवारणाखाली हाती घेतलेली कामे ही फायद्या-तोटयाचा विचार न करता करण्याची भूमिका आरंभी होती. या भूमिकेवर इंग्लंडमध्ये टीका होऊ लागली. तेव्हा धोरण बदलून, गुंतवलेल्या पैशावर पुरेशा प्रमाणात लाभ होणार आहे हे दिसून आले पाहिजे, असा आग्रह धरण्यात आला. धरणप्रकल्पांचा अलीकडील इतिहास जर पाहिला तर धरणे बांधावयाची हा निर्णय प्रथम होतो. तो अंशतः राजकीय निर्णय असतो. अंशतः, आर्थिक दृष्टया परवडते की नाही ही कसोटी न लावता, अमुक-तमुक उद्दिष्टे पूर्ण करण्यासाठी धरण हे बांधलेच पाहिजे असा तो निर्णय असतो. उदाहरणार्थ, सरदार सरोवर ही गुजरातची जीवनरेखा आहे असे प्रामाणिक मत बाळगणारे श्री. चुनीभाई वैद्य यांच्यासारखे कार्यकर्ते असे सरळच म्हणतात, की गुजरातच्या लोकांना तुम्ही पिण्याचे पाणी देणार की लाभ-खर्चाचा ताळेबंद काढीत बसणार ? आणि त्यांचे म्हणणे रास्त आहे.

लाभ वाढवून दाखविणे, खर्च कमी दाखवणे यासाठी अनेक युक्त्या लोकांजवळ असतात. उलट, खर्च वाढवून दाखवणे व लाभ कमी दाखवणे यांच्यापण युक्त्या तेवढयाच हाताशी असतात. पण काही प्रमाणात हा युक्त्यांच्या पलीकडे जाणाराही मुद्दा आहे. उदाहरणार्थ, बुडणाऱ्या जंगलाची किंमत किती धरावयाची ? ती सरदार सरोवर व नर्मदासागर यांच्या बाबतीत, दाभोलकरांच्या माहितीप्रमाणे, हेक्टरमागे १ कोटी २७ लाख रुपये धरायला हवी असा ठराव केंद्रीय वन व पर्यावरण खात्याने स्वीकारला ही धरणाची अडवणूक करण्यासाठी युक्तीने खेळलेली खेळी आहे असे तिच्याकडे पाहणे योग्य नाही. अरण्याची किंमत झाडे कापून मिळू शकणाऱ्या ( मृत ) लाकडांच्या किंमतीइतकीच असते असे मानणे यात मोठा असमंजसपणा आहे. श्री. शरद जोशींची जी प्रतिक्रिया दाभोलकरांनी पुस्तकात दिली आहे ती अशी असमंजस आहे. वास्तविक तो लाभही न मोजता येणाऱ्या किंमतीचा म्हटला पाहिजे. आजच्या व उद्याच्या लोकांना पोटभर अन्न मिळावे यासाठी अनिवार्यतः अनंत मूल्य असलेले जंगल नष्ट करावे लागले तर तेही केले पाहिजे, कारण पाणी व अन्न यांचे मोलही अनंतच असणार. शहाण्या माणसाने या घोळात सापडू नये, हे दाभोलकरांच्या लक्षात आले आहे. पण मग जागतिक बँकेने कर्ज दिलेय त्या अर्थी प्रकल्प चांगलाच लाभदायी असला पाहिजे असेही त्यांनी म्हणू नये.

मुद्दयाच्या बाबी वेगळयाच आहेत : ( १ ) ज्या गरजा पायाभूत व प्राणभूत आहेत व त्या कितीही खर्च येवो भागवल्याच पाहिजेत असा दावा केला जातो त्या गरजा खरोखर त्या पात्रतेच्या आहेत ना हे तपासून घ्यायला हवे. त्यांची काटेकोर मांडणीपण करायला हवी. (२) त्या गरजा भागविण्याचे जे वेगवेगळे पर्याय आहेत त्यांमधून अन्य मौलिक तत्त्वांचा व गोष्टींचा किमान तेवढाच बळी देणारा पर्याय आपण निवडतो आहोत ना याची शहानिशा करून घेतली पाहिजे. (३) अन्य मौलिक तत्त्वांची व गोष्टींची जपणूक करणाऱ्या विकल्पांचा कसून शोध घेतला पाहिजे. आणि (४) जो पर्याय आपण निवडू त्याचा वापर मौलिक व पायाभूत गरजांच्या समाधानासाठी होईल, सर्व पथ्ये सांभाळली जातील याची चोख व्यवस्था करण्याला बांधील राहिले पाहिजे.

म्हणजेच, सरदार सरोवर व नर्मदासागर धरणे तांत्रिक दृष्टया आपण बांधू शकतो की नाही एवढी एकच कसोटी उरत नाही. अन्न, पाणी यांच्याबरोबरच, तेवढयाच मौलिक असलेल्या इतर तत्त्वांचा व गोष्टींचाही स्वीकार करणे ही शर्त ठरते. जंगले, पर्यावरणाचा समतोल, आध्यात्मिक-सांस्कृतिक वारसा, विस्थापित होणाऱ्या लोकांचे मूलभूत हक्क इत्यादी गोष्टी/तत्त्वे

मौलिक महत्त्वाच्या आहेत याचा मनःपूर्वक स्वीकार या धरणांचे समर्थन करणारे करीत नाहीत. त्यामुळे ना ते गंभीरपणे स्वतः विकल्पांचा शोध घेत, ना इतरांनी पुढे ठेवलेल्या विकल्पांचा विचार करीत, ना किमान अनिवार्य तेवढीच किंमत मोजावी लागावी अशी मर्यादा स्वतःवर घालून घेत. इतकेच नाही तर, युक्तिवाद करताना तहानेने व्याकूळ, भुकेने व्याकूळ झालेल्यांना पुढे करतात. पण तो केवळ वादात, मात करण्यासाठी केलेला मुद्दा असतो.

× × ×

खरा वाद याच कारणाने आहे. तो दाभोलकरांनी टाळला आहे. आपल्या या कृतीचे समर्थनही ते अशा पद्धतीने करतात की वाचकाला वाटावे की हे पर्यावरण-वादी, पर्यायी विकासनीतीवाले असमंजस, हटवादी व जरा मूर्खच आहेत. हृदयाचे बायपास ऑपरेशन करण्याचे उदाहरण ते देतात. ॲलोपथीमध्ये श्रद्धा असणाऱ्या व्यक्तींना या शल्यक्रियेशिवाय पर्याय नाही हे पटलेले असते. आता होमिओपथी, आयुर्वेद, निसर्गो-पचार, इत्यादी अन्य चिकित्सा व उपचारप्रणालींच्या मते पर्याय आहेत, असा मुद्दा मांडला तर याचा निर्णय करण्याची रीत कोणती होईल? अशा प्रकारचे उदाहरण ते घेतात. उदाहरण निवडण्यातली हुशारी लक्षात घ्या. त्या व्यक्तीने आधीच्या आयुष्यात ज्या प्रकारे जीवन जगलेले असते त्यामुळे किंवा अंगभूत न्यूनतेमुळे ( Congenital defect ) हृदयाच्या अवयवांची क्षमता इतकी ढासळलेली असते की त्यांचे 'पुनर्नूतनीकरण' निसर्गाच्या रीतीने अशक्य व्हावे. अशा विशेष अवस्थेत ॲलोपथीखेरीज इतर प्रणालींची माणसेही शल्यक्रियेच्या उपायाची शिफारस करण्याची शक्यता आहे. अशा उदाहरणांबद्दल आक्षेप असा, की वादाच्या मुद्द्याशी त्यांची जातकुळी जमत नाही. म्हणजे, या उदाहरणाच्या आधारे कशाचीच स्पष्टता होत नाही. निसर्गाची शरीरयंत्रणा इतकी ढासळलीय की धरणाची भिंत बांधूनच ती सावरता येईल अशातला प्रकार आहे का? किंवा, हृदय क्षीण झाले आहे, उपाय काय करावा यासारखा प्रश्न घेऊन आपण खगोलशास्त्रज्ञाकडे जाणे हास्यास्पद ठरेल पण धरण बांधावे की नाही हा प्रश्न या प्रकारचा केवळ तांत्रिक-अभियांत्रिकी प्रश्न नाही. तरीपण दाभोलकरांनी निवडलेले उदाहरण देऊनच पुढे जाऊ. बायपास सर्जरीद्वाराही शल्यविशारद काय करीत असतो? एक स्वयंनियंत्रित व्यवस्था म्हणून हृदय कसे काम करते ते जाणून घेतो व त्याच पद्धतीने काम करण्याची क्षमता हृदयाला पुन्हा प्राप्त करून देण्यासाठी किमान तेवढाच हस्तक्षेप करतो. तंत्रवैज्ञानिक हस्तक्षेपही निसर्गव्यवस्थेची बांधणी अभंग राखणारा, तिचा पूर्ण आदर करणारा असतो. बायपास सर्जरी ज्या अवस्थेत केली जाते त्या अवस्थेतल्या हृदयाचे कार्यही पुन्हा उत्तम रीत्या होऊ लागेल असा इतर चिकित्सा-प्रणालींचा दावा वा युक्तिवाद काय होता ते दाभोलकर सांगत नाहीत. अंतिमतः रक्ताभिसरण कार्यक्षमतेने करण्याची हृदयाची एक संयंत्र म्हणून असलेली क्षमता हृदयाला पुनरपि प्राप्त करून देण्याचेच वेगवेगळे तंत्र-वैज्ञानिक उपाय ते असतात.

मोठी धरणे ही बायपास सर्जरीशी तुल्यबल गोष्ट आहे का? सकृद्दर्शनी दोन्ही हस्तक्षेप एकाच प्रकारचे दिसतात. धरण ही नदीवर केलेली जणू बाय-पास सर्जरीच भासते. पण धरणाची भिंत बांधण्याचा व कालव्यांनी पाणी सर्वदूर खेळविण्याचा हस्तक्षेप हा निसर्गाची शेतीला पाणीपुरवठा करण्याची व्यवस्था कशी काय करते हे जाणून घेऊन, तिचे अभंगत्व कायम ठेवून केलेला हस्तक्षेप नाही. पर्यावरणाचा सम-तोल कायम राखला पाहिजे असे म्हणणारे निसर्गाच्या व्यवस्थेच्या अभंगत्वाचा आग्रह राखत असतात. 'नदीचे वाहणे हे तिचे जीवन आहे व तिच्यावर बांध घालणे हा तिचा मृत्यू आहे असे मी मानतो' असे सुंदर-लाल बहुगुणा म्हणतात तेव्हा ते अलंकारिक भाषेत मुद्दा हाच करीत असतात. शेतीसाठी, पिण्यासाठी, इतर आवश्यक गरजांच्या पूर्ततेसाठी पाणी उपलब्ध करून न देता भारताच्या लोकांनी भुकेने व तहानेने तडफडत राहावे व मरण येईल तेव्हा 'देवाचे स्मरण' करीत ते मुकाटचाने पत्करावे अशी बहुगुणांची भूमिका आहे असे दाभोलकर भासवितात. भाषेच्या अलंकारिक वापरावरच आक्षेप घ्यावयाचा झाला तर खुद्द दाभोल-करही 'माते नर्मदे' हे शीर्षक पुस्तकाला देण्यापासून पुस्तकात वारंवार अलंकारिक भाषा वापरतात ही गोष्ट आपण नमूद करूया. सरदार सरोवर व नर्मदा-सागरासारखी महा-धरणे बांधावी म्हणणाऱ्यांना लोकांना खाऊपिऊ घालण्याची चिंता आहे तर पर्यावरणवादी मंडळींना स्वतःच्या काही तऱ्हेवाईक आवडींची चूष तेवढी आहे हा आभास निर्माण करून दाभोलकर

वादाचा खरा मुद्दा टाळतात, अंगाबाहेर टाकतात.

'तुम्हाला होमिओपॅथीच्या गोळ्या घेऊन बरे व्हायचे असेल तर ऑपरेशन करणारा डॉक्टर त्याबाबत काही सांगू शकत नाही. होमीओपॅथी बरी की चांगली, ती प्रमुख आजारांसाठी वापरावी की सर्दी-पडसे वगैरेंसाठी हा एक वेगळा विषय असतो' असे म्हणून 'त्यात आपणास शिरावयाचे नाही' असे दाभोलकर म्हणतात. अभियंते मोठी अजस्र धरणे बांधू शकतात की नाही हा वादाचा मुद्दा नाही; बांधकाम होऊ शकते ही गोष्ट निर्विवादच आहे. 'होमिओपॅथी ही प्रमुख आजारांसाठीदेखील अधिक श्रेयस्कर आहे की नाही' हाच वादाचा मुद्दा आहे. मानवजातीचा विकास चिरंजीवी ठरावयाचा असेल तर निसर्गाच्या व्यवस्थेशी व रीतींशी संवादी, त्यांना अनुसरून, व त्यांची पथ्ये सांभाळूनच तो केला पाहिजे; आणि तसा तो करता तर येतोच, पण तो अधिक न्याय्य व निकोपपण असतो, हे प्रतिपादन आहे.

मानवसमाजांना मध्ययुगात वा त्याहूनही आधीच्या प्राचीन युगात घेऊन जाऊन पुन्हा एकवार त्यांनी आदिम अवस्थेतील जीवन जगण्यास आरंभ करावा अशी पर्यावरणवाद्यांची, पर्यायी विकासनीती-वाल्यांची भूमिका आहे असे म्हणणे वाचक-प्रेक्षकांना चटकन प्रभावित करते. पण हा विपर्यास आहे. आदिम अवस्थेच्या कमी-अधिक जवळपास येणारे आदिवासी लोक हे तेवढ्या प्रमाणात असंस्कृत असतात, किंवा ते आपल्या पद्धतीचे भौतिक जीवन जगत नाहीत म्हणून त्यांचे जीवन ही दारिद्र्याची पूजा असते या विधानांचा प्रतिवाद करणे आवश्यक आहेच. पण इथे मुद्दा आहे तो निसर्गव्यवस्था व रीती यांच्याशी संवादी पद्धतीने, तिची पथ्ये सांभाळून होईल तेवढा व तोच विकास मानावयाचा; की, कोणतीही पथ्ये सांभाळण्याची गरज नाही, आणि निसर्गाशी संवादी राहण्याचे कारण नाही, निसर्गाला हटवून कृत्रिम प्रतिसृष्टी निर्माण करण्यासाठीच मानवाचा अवतार आहे असे मानावयाचे, हा. विकास कशाला म्हणावयाचा, विकास कसा साधावयाचा, विकास साधत असताना कोणती पथ्ये सांभाळावयाची असा प्रश्न आहे.

तंत्रविज्ञानाच्या दृष्टीने आणखी नवे नवे व आकाराने मोठे वा अजस्र, 'नेत्रदीपक' असे जे जे करता येणे शक्य आहे ते ते प्रत्यक्षात आणत जाणे ही विकासाची प्रमुख कसोटी होऊ शकते का? विकासाचा संबंध मूल्ये व ध्येये यांच्या संदर्भात, वास्तविक, खऱ्या गरजांच्या संदर्भात योग्य, उचित व श्रेयस्कर जे असेल त्यांच्याशी असतो, असायला हवा? सरदार सरोवर व नर्मदासागर ही धरणे अनिवार्य आपद्धर्माच्या स्वरूपाची शल्यक्रिया आहे की तो अनावश्यक फाजील व घातक हस्तक्षेप आहे हे 'शास्त्रीय' चर्चेच्या आधारे दाभोलकरांनी ठरविलेले नाही. अशी शास्त्रपूत चर्चा करावयाची झाल्यास कोणते मुद्दे विचारात घ्यावयास हवेत याचे भानदेखील त्यांच्या लेखनात आढळत नाही.

× × ×

उदाहरणार्थ विजेचा मुद्दा घेऊ. खरोखरची शास्त्र-शुद्ध भूमिका प्रथमच तीन मुद्दे मांडेल. पहिला हा की, आपण विजेबद्दल बोलत असतो, पण खरे तर आपण ऊर्जेच्या भाषेत बोलले पाहिजे. वीज हा तिचा एक प्रकार आहे. दुसरा मुद्दा असा की, ऊर्जेचे स्रोत विचारात घेताना अणुविभाजन/संयोग, खनिज तेल, कोळसा वा जल यांचाच विचार करणे चुकीचे आहे. ऊन, वारा, समुद्राच्या लाटा इत्यादी इतर स्रोतही आहेतच. पण या देशातील मनुष्यबळ व पशुधन हेदेखील ऊर्जेचे मोठे व महत्त्वाचे स्रोत आहेत. तिसरा मुद्दा असा की, विभिन्न प्रकारची अनेकानेक कामे करण्यासाठी ऊर्जा लागते. ऊर्जेचे विविध प्रकारचे उपलब्ध साठे लक्षात घेऊन आणि आपल्यावरील इतर आर्थिक, सामाजिक व पर्यावरणीय निर्बंधांची दखल घेऊन कोणत्या कामांसाठी कोणते, ऊर्जा स्रोत वापरावे हा विचार केला जाणे महत्त्वाचे आहे. भारताला वीज किती हवी व तिचे उत्पादन कसे करावयाचे हे ठरवण्याच्या आधी वरील मुद्द्यांच्या अनुषंगाने भूमिका निश्चित करायला हवी.

मनुष्यबळ व पशुधन यांची उपलब्ध शक्ती न वापरता पडून राहील इतक्या स्वस्त दरात वीज वा डिझेल उपलब्ध करून देणे, वा विजेच्या वापरावर अवलंबून असणारे उत्पादनतंत्र सरसकट वापरात आणणे आपल्या देशाच्या परिस्थितीत उपकारक व श्रेयस्कर आहे का? म्हणजेच, ऊर्जेचा वापर करण्याच्या संदर्भात अनुरूप वा समुचित तंत्रविज्ञान (ॲप्रोप्रिएट टेक्नॉलॉजी) हा मुद्दाही शास्त्रपूत चर्चेत उपस्थित होतो.

अनुक्रमणिका

विजेच्या उत्पादनाकडे आपण वळलो की इतर काही प्रश्न उपस्थित करावे लागतात. आज उपलब्ध असलेल्या विजेचा कार्यक्षमतेने व काटकसरीने वापर करण्यास महत्त्व द्यावयाचे की फक्त आणखी आणखी वीज उत्पादन करीत जाणे हेच एकमेव लक्ष्य मानावयाचे ? वीज उत्पादन करण्याच्या आजच्या क्षमतेचा ( इन्स्टॉल्ड कपॅसिटी ) पुरेपूर वापर होईल, आज उभारलेली संयंत्रे ( प्लॅन्टस् ) कमाल कार्यक्षमतेने चालतील याकडे दुर्लक्ष करून क्षमता वाढवीत नेण्यालाच प्राधान्य द्यावयाचे का ? आणखी वीज उत्पादन करण्यासाठी जी भांडवली गुंतवणूक करावी लागणार आहे व ते प्रकल्प चालू ठेवण्यासाठी जो नंतर खर्च करीत राहावे लागणार आहे त्याचा बोजा किती, व देशाच्या अन्य अग्रक्रमांच्या गरजांच्या पूर्ततेसाठी आवश्यक भांडवल गुंतवणुकीची मग व्यवस्था काय ? म्हणजेच, वीजउत्पादनासाठी नव्याने करावयाच्या भांडवली गुंतवणुकीची कमाल मर्यादा कोणती ?

अशा प्रकारचे कोणतेच प्रश्न वा मुद्दे दाभोलकर उपस्थित करीत नाहीत. दर डोई विजेची खपत, एकूण वीजउत्पादन, औष्णिक व जलविद्युत् यांचे परस्परप्रमाण या पातळीवरच ते युक्तिवाद करतात. जलशक्तीचा वापर करून इतर देश त्यांच्या एकूण वीजउत्पादनापैकी किती टक्के वीज उत्पादन करतात त्याचा तक्ता देऊन भारत किती मागे आहे असे दाखवून देतात. जलसंपत्ती कितीतरी जास्त असून आपण किती कमी प्रमाणात वीजनिर्मितीच्या कामी तिला वेठीला धरलेय ते सांगतात. नर्मदाप्रकल्प, टिहरी यांसारख्या महाधरणांनाही खुजे ठरविणारी, प्रचंड प्रमाणात वीज निर्माण करणाऱ्या देशोदेशींच्या धरणांची माहिती देतात. विकासाचे आजवर हेच मापदंड मानलेले आहेत यात शंका नाही. पण म्हणून तेच आपण भविष्यासाठी वा आपल्या देशासाठी स्वीकारले पाहिजेत असे निष्पन्न होत नाही. पाश्चात्त्य सधन देशांची बरोबरी करण्यासाठी त्यांचे अनुकरण करण्याच्या प्रयत्नांमुळेच स्वातंत्र्य मिळून चाळीस-बेचाळीस वर्षे उलटल्यावरही तीस कोटी लोकांच्या उपासमारीचा व रोजगाराचा प्रश्न न सुटलेला तर राहिला नाही, असाही प्रश्न दाभोलकरांनी स्वतःस विचारावयास हरकत नाही.

× × ×

'कडवे' / 'अतिरेकी' पर्यावरणवादी, पर्यायी विकासनीतीवाले व विस्थापितांच्या योग्य पुनर्वसनावरच आपली भूमिका घेणारे अशी तिन्ही प्रकारची मंडळी नर्मदेवरील धरणांना विरोध करण्यासाठी एकत्र आलेली आहेत. अशा एकत्र येण्यालाच दाभोलकरांचा आक्षेप आहे का ? पर्यायी विकासनीतीवाल्यांनी वा पर्यावरणवाद्यांनी विस्थापितांच्या हक्कांविषयी, त्यांच्या पुनर्वसनाविषयी प्रश्न उपस्थित करणे हेच ते आक्षेपार्ह मानतात का ? आपापल्या भूमिकांमधून प्रकल्पाला या मंडळींनी स्वतंत्रपणे विरोध नोंदवलेला होताच.

विस्थापितांच्या पुनर्वसनाचा मुद्दा नर्मदाप्रकल्पाच्या विरोधी चाललेल्या आंदोलनाचाच एक महत्त्वाचा मुद्दा जरूर आहे. मात्र त्याची दोन अंगे आहेत. जवळपास पाऊण एक लाख लोक सरदार सरोवर धरणामुळे विस्थापित होणार आहेत. तुलनेने नर्मदासागर धरणाने विस्थापित होणाऱ्यांची संख्या कमी आहे. इतक्या लोकांचे पुनर्वसन प्रकल्पाने स्वीकृत केलेल्या तरतुदींनुसार समाधानकारकपणे खरोखर होणे शक्य आहे का ? या बाबतीत सरकारी यंत्रणेच्या निर्धाराचा, तयारीचा, व व्यवहाराचा अनुभव काय आहे ? का हा सर्व बोलाचीच कढी व बोलाचाच भात असा प्रकार होणार आहे ? एका अंगाने हे प्रश्न आहेत. दुसऱ्या अंगाने, अशा प्रकारे समूहांना विस्थापित करण्यावर आधारित विकासनीतीलाच आक्षेप आहे. तो केवळ पर्यावरणवादी भूमिकेतून नाही तर मानवी अधिकार व सुसंस्कृतता या मुद्द्यांवरून आहे.

पर्यायी विकासनीतीचा आग्रह बाळगणाऱ्यांचे वा विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या मुद्द्यावरून, हे पुनर्वसन समाधानकारकपणे होण्याची सुतराम शक्यता नाही असे ठामपणे प्रतिपादन करणाऱ्यांचे म्हणणे दाभोलकरांनी प्रथमतः नीटपणे द्यावयास हवे होते. त्यांनी ज्यांच्या मुलाखती घेतल्या त्यांच्या मुलाखतींचेही व्यवस्थित निवेदन करण्याची प्राथमिक शिस्त पाळलेली नाही. स्वतःच्या प्रतिक्रियात्मक निवाड्यांना पोषक अशी वाक्ये वा तुकडे वा घटना तेवढ्या संदर्भ सोडून दिल्या आहेत. यांपैकी काहींनी लेखनही केलेले आहे, आणि ज्यांच्या मुलाखती घेतलेल्या नाहीत अशांनीही. मुलाखती समाधानकारक झाल्या नसतीलही; त्याचा दोष मुलाखत देणाऱ्याकडे जसा अंशतः





जातो तसा तो घेणाऱ्यांकडेही जातो. पण व्यवस्थित स्वरूपात पूर्वपक्ष मांडण्याची जबाबदारी टळत नाही.

'वाल्ल्यांची नवी राणी' अशा शब्दांत दाभोलकर श्रीमती मेधा पाटकर यांना गौरवितात. ठाणे जिल्ह्यातील वाल्ली लोकांमध्ये जागृती व संघटन घडवून आणवून त्यांचे लढे उभारणाऱ्या ३५ ते ४० वर्षांपूर्वीच्या श्रीमती गोदावरी परुळेकर या प्रख्यात कम्यूनिस्ट नेत्यांशी याचा संदर्भ आहे हे उघड आहे. हा गौरव आहे की चेष्टा असे मात्र पुस्तक पूर्ण वाचल्यावर मनात येते. नर्मदेच्या खोऱ्यात, विशेषतः महाराष्ट्रातील आदिवासी व निमाड (मध्यप्रदेश) चे बिगर-आदिवासी प्रकल्पग्रस्त आणि सरदार सरोवरासाठी फार पूर्वी विस्थापित केले गेलेले पण प्रकल्पग्रस्त म्हणून ज्यांना मान्यता नाकारली आहे असे धरणाच्या स्थलाच्या परिसरातील गुजराथीभाषिक आदिवासी यांच्या संघटना उभारून पुनर्वसन योग्य प्रकारे व समाधानकारक रीत्या होईल याची खात्री पटवून घेण्यासाठी मेधा पाटकर व त्यांच्या सहकाऱ्यांनी जवळपास तीन वर्षे शासकीय यंत्रणेशी– (पूर्णपणे सनदशीर बोलणी करण्याच्या भूमिकेतून) अविरत संघर्ष केला. 'सरदार सरोवर : विकास की विनाश' या त्यांच्या पुस्तिकेत या प्रयत्नांचा आढावा आहे. जमल्यास १९८८ च्या अखेरपावेतो पुनर्वसनाच्या मुद्द्यावरून समाधान झाले तर सरदार सरोवर प्रकल्पासच विरोध करण्याची भूमिका आमच्या संघटना घेणार नाहीत, या संघटनांमधील लोक काही 'पर्यावरणवादी' नाहीत. अशी मेधा पाटकरांची भूमिका होती, या गोष्टीचा साऱ्या पुस्तकात निर्देश येत नाही. तळापासून थेट दिल्लीपर्यंत शासकीय पुस्तकात त्यांना आलेल्या अनुभवांची व्यवस्थित नोंद यायला हवी होती. त्या या भूमिकेवर होत्या त्या काळात विस्थापितांसाठी गुजराथ सरकारने काय काय देऊ केले आहे ते त्यांना चांगले माहीत होते. या तरतुदी संघटित दबावामुळे किती मंजूर केल्या गेल्या व किती स्वयंप्रेरणेने स्वीकारल्या हा विवाद्य मुद्दा होऊ शकेल. पण या तरतुदी 'आंधळ्याने मागावा एक डोळा व देवाने द्यावेत दोन डोळे' या स्वरूपाच्या, आदर्श पुनर्वसनाच्या पुष्कळ जवळ येणाऱ्या आहेत. ही गोष्ट त्यांनाही मान्य होती. यातल्या त्रुटी दूर करून घेण्याचा त्यांचा त्या वेळी प्रयत्न होता. या तरतुदींनुसार प्रत्यक्षात पुनर्वसन होईल अशी खात्री पटली असती तर धरणाला विरोध न करण्याची त्यांची भूमिका कायम राहिली असती.

'देअर इज मेनी अ स्लिप बिटवीन द कप अँड द लिप' ही म्हण पुनर्वसनाच्या संदर्भात फारच खरी आहे. आजवर क्वचितच कोणत्या प्रकल्पात विस्थापितांचे तरतुदींचे काटेकोर पालन करून पुनर्वसन झाले आहे. धरणाच्या बांधकामाच्या समांतर वेळापत्रकानुसार पुनर्वसनाची व्यवस्था व प्रत्यक्षात पुनर्वसन होणे ही बांधकाम चालू राहण्याची पूर्व शर्त असायला हवी, आणि ती पाळली जात नसेल तर साध्या कारवाईने धरणाचे काम थांबविता येण्याइतका अधिकार विस्थापितांना असला पाहिजे. राष्ट्रहित, विकास हे मुद्दे उपस्थित करून न्यायाधीशासही या अधिकारास मुरड घालता आली न पाहिजे. अनुभवाने या क्षेत्रातील कार्यकर्ती मंडळी या भूमिकेवर आली आहेत.

सरदार सरोवर विस्थापितांच्या पुनर्वसनाची उकल समाधानकारकपणे अद्यापि होत नाही हे मान्य करून या मुद्द्याची चर्चा दाभोलकरांनी पृ. १३२–१३३ वर केली आहे. खात्याखात्यांतील विसंवाद व मानापमानाच्या कल्पना, किती विस्थापित गुजराथमध्ये जायला तयार आहेत व किती स्वतःच्या राज्यात, किती जणांना पुनर्वसित व्हायचे आहे हे निश्चित न झाल्याने राज्य सरकारांची झालेली अडचण, महाराष्ट्रातील आदिवासींना जंगलातच पुनर्वसित व्हायचंय पण जंगल, जमिनी, केंद्रीय पर्यावरण व वन खाते द्यायला तयार नाही, अशी कारणे देऊन ते लिहितात, "या अशा परिस्थितीत विस्थापितांना वेगवेगळे संदेश देऊन गोंधळ हवा तसा वाढविता येऊ शकतो. म्हणजे खात्याखात्यांतील, राज्याराज्यांतील विसंवादाचे मुद्दे शोधून त्याला तत्त्वाची जोड देऊन हट्टाग्रह चालवायला कार्यकर्त्यांना संधी आहे. आणि हा विसंवाद न वाढविता कमी करावयास जे प्रशासकीय कौशल्य लागते ते सरकारी यंत्रणेने दाखविलेले नाही !" आंदोलकांच्या हेतूंविषयी शंका घेऊन मतलबीपणाचा, कारस्थानी धूर्तपणाचा आरोप करण्यासाठी आकार देण्याची गरज त्यांना वाटलेली नाही.

सार्वजनिक जीवनातील मान्यवर व्यक्तींची एक लोकआयुक्त पद्धतीची समिती पुनर्वसनाचे काम चोखपणे व वेळेत केले जाईल यासाठी नेमता येईल ही कल्पना दाभोलकरांनाच प्रथम सुचलीय असे ते भासवितात.

अशा स्वायत्त यंत्रणेची पुरेशा अधिकारांसह स्थापना करावी व अशा यंत्रणेवर विस्थापितांच्या संघटनांना रास्त प्रमाणात प्रतिनिधित्व असावे हा प्रस्ताव आंदोलकांनी कधीच सुचवलेला आहे. ही केवळ सल्लागार समिती असून चालणार नाही. कितीही महागात पडो पण, पुनर्वसन चोखपणे होत नसेल तर धरणाचे काम स्थगित ठेवण्याचा अधिकार या यंत्रणेला असला पाहिजे हे एक, व या यंत्रणेवर सरकारी अधिकाऱ्यांची व राजकारणी पुढाऱ्यांची नेमणूक होता कामा नये; उच्चपदस्थ सरकारी अधिकाऱ्यांनाही 'सेवक' या नात्यानेच वास्तवात या यंत्रणेसमोर येऊन खुलासे द्यावे लागले पाहिजेत. रेटून धरणाचे बांधकाम चालू ठेवता येणार नाही ही गोष्ट राज्यसरकारे व केंद्रीय यंत्रणा यांना कळली तरच अशा स्वायत्त यंत्रणेस पुरेशा गंभीरपणे घेतले जाईल. श्री. माधवराव चितळे यांना जर दाभोलकरांची कल्पना चांगली वाटते तर, आंदोलकांचे म्हणणे काय आहे ते काहीसे बाजूला ठेवून, त्यांनी यंत्रणेची नेमणूक का केलेली नाही, असाही प्रश्न विचारता येईल.

दाभोलकरांनी श्री. शरद जोशी यांचे मत उद्धृत केले आहे. कोणत्याही प्रकल्पामुळे विस्थापित झालेल्यांचे नंतर काय झाले, जमीन घेतली त्यांची स्थिती चांगली आहे की ज्यांनी पैसे घेतले त्यांची हे पाहावे असे त्यांनी सुचवलेय. असा अभ्यास जरूर करावा. मुळशी धरणाने विस्थापित झालेल्यांचा आज असा अभ्यास केला तर दोन-तीन पिढ्यांनंतर अनेक कुटुंबे मूळ स्थितीशी तुलना करता, चांगल्या परिस्थितीत सापडली तर आश्चर्य वाटायला नको. पण या प्रकारचे चलनवलन प्रकल्प न झालेल्या भागांमध्येही आढळून येईल. लोकांची स्थिती सुधारावी म्हणून विकासप्रकल्पाच्या आधारे लोकांना शेतीवरून विस्थापित करीत जावे, असा धोरणात्मक निष्कर्ष निघतो का? जमिनीसाठी जमीन न देता, 'भरपूर पैसे देऊन, नव्या व्यवसायासाठी वा नोकरीसाठी त्यांना (विस्थापितांना) तयार करून, सरकार, कार्यकर्ते, सेवाभावी संस्था या सर्वांनी मिळून समर्थपणे नव्या उद्योगांत, नोकरीत त्यांची स्थापना करावी' अशी श्री. शरद जोशींची सूचना आहे. दाभोलकरांना ती पसंत दिसते. येथेही सुद्धा 'भरपूर पैसे देण्याचा' नसून 'समर्थपणे नोकरी-व्यवसायांत स्थिर करण्याचा' आहे. समजा, हा पर्याय नर्मदाप्रकल्पग्रस्तांनी स्वीकारला तरी, वरील तत्त्वाची व्यावहारिक पातळीवर काटेकोर स्पष्टता करावी लागेल. लाभकारक शेतकरी, उद्योगपती व अन्य यांची पातळी अमुक इतकी उंचावेल अशी जी काही अपेक्षा असेल त्या पातळीशी तुल्यबल पातळीवर विस्थापितांना स्थिर करण्याचा कार्यक्रम बनवला पाहिजे. व अशा कार्यक्रमांची चोख वेळापत्रकानुसार अंमलबजावणी ही मग पूर्वशर्त असेल, व यात चालढकल झाली तर धरणाचे काम स्थगित होईल हे स्पष्टपणे मान्य केलेले असेल, ही गरज राहीलच.

दाभोलकरांना बाबा आमटे व मेधा पाटकर यांनी या त्यांच्या पुस्तकासाठी मुलाखती दिल्या नाहीत. मुलाखती घेण्याच्या स्वतःच्या विशिष्ट शैली व पद्धतीला ही प्रतिक्रिया होती असे दाभोलकरांनी सुचवले आहे. मुलाखत मिळाली नाही तरी विस्थापितांच्या पुनर्वसनाविषयीचे, शासकीय यंत्रणांच्या वागणुकीविषयीचे, आणि वेगवेगळ्या यंत्रणांच्या बैठकींमध्ये सरकारी अधिकाऱ्यांनी केलेल्या निवेदनांविषयीचे मेधा पाटकरांचे टीकात्मक लेखन उपलब्ध आहे. माझा स्वतःचा अनुभव असा आहे की, नर्मदाप्रकल्पविषयक कागदपत्रांचा पाटकरांचा अभ्यास तपशिलांसकट फार पक्का आहे. जे क्षेत्र बुडणार आहे तेथील वास्तवांशी त्यांचा सततच जिवंत संबंध आहे. तुलनेने वरिष्ठ पातळीच्या प्रकल्पसमर्थकांची भिस्त औपचारिक तरतुदी, आकडेवारी व कागदी घोडे नाचविण्यावर आहे. सरकारी, निमसरकारी यंत्रणांना डावलून प्रकल्पाची अंमलबजावणी शक्य नाही ही गोष्ट जशी खरी तसेच सरकारी, निमसरकारी यंत्रणा, पूर्वानुभव पाहता, विश्वासपात्र नाहीत ही गोष्टही खरी. गोपनीयतेच्या संरक्षक कवचाच्या आडून निरंकुश अधिकार गाजविण्याची सवय शासकीय यंत्रणेस जडलेली आहे. मतलबी राजकारणी हस्तक्षेप ही यंत्रणा खपवून घेते इतकेच नव्हे तर अशा हस्तक्षेपाशी प्रसंगी हातमिळवणीही करते. पण लोकहितार्थ लोकांचा अंकुश ती स्वीकारावयास तयार नसते. मेधा पाटकर व त्यांचे प्रकल्पग्रस्त साथी यांचा प्रदीर्घ कटू अनुभव एका बाजूला ठेवून विस्थापितांच्या पुनर्वसनाविषयीच्या कागदोपत्रींच्या तरतुदींच्या आधारे दाभोलकरांनी निवाडा करावा यात त्यांच्या भूमिकेचा कच्चेपणा, भूमिकेतले न्यून उघडे होते. प्रकल्पग्रस्त लोकांमध्ये, त्या प्रदेशात न जाण्याचे ते आत्मगौरवपर समर्थन

देतात तेही पटणारे नाही. त्यांचे सारे विवेचन एकतर्फी व पक्षपाती बनते.

× × ×

आदिवासी विस्थापितांच्या संदर्भात दाभोलकर वाली, जटायू व हनुमान या रामायणातील तीन व्यक्तिरेखांचा प्रतीकरूपाने निर्देश करतात. जेत्या संस्कृतीमधील मंडळींची सोयच सोय असते. वालीचा वध हा कोणत्याही अंगाने पाहता अन्याय्य व अनैतिक होता असेही म्हणायचे आणि त्याच वेळी वर्धिष्णु व बलिष्ठ संस्कृतीला विरोध करणाऱ्या वालीचा वध होणे ही अटळ नियतीच असते असाही निवाडा करून वाली असमंजस, हट्टी, मागास व अप्रगल्भ होता असेही सुचवावयाचे. हनुमानाने रामाची साथ केली, म्हणजेच तो 'मुख्य प्रवाहा'त सामील झाला, त्याचे कसे छान भले झाले, असे कौतुक करून वालीच्या निवाड्यावर शिक्कामोर्तब करावयाचे ! दाभोलकर लिहितात, "प्रश्न सोडवायचा असेल, किमान समजावून घ्यावयाचा असेल तर या देशाचा इतिहास, संस्कृती आणि निसर्गाचे, विज्ञानाचे गतिमान नियम यांचे भान हवे. खरी गोष्ट अशी आहे की, विकासाच्या, उत्क्रांतीच्या, क्रांतीच्या प्रत्येक टप्प्यात यापूर्वी आपले हे भाऊ मात्र (म्हणजे आदिवासी) निर्दयपणे चिरडले गेलेत." स्वतःच्या विधानांमध्ये असलेल्या विसंवादांनी दाभोलकर अस्वस्थ होत नाहीत. आपण जर 'गतिमान नियमां'ची गोष्ट करीत असलो तर भाऊ, निर्दय असे नैतिक आशय असलेले शब्द वापरता येत नाहीत. त्या साऱ्या प्रक्रिया न-नैतिक असतात, व त्याच कोनातून त्या जाणून घेणे व स्वीकारणे योग्य असते. जे घडते ते घडते इतकेच. जगण्यासाठीच जीवघेणा संघर्ष हेच सृष्टीतले पायाभूत वास्तव आहे व या संघर्षात जो श्रेष्ठ, बलिष्ठ, वर्धिष्णु, प्रगत, प्रगल्भ वगैरे असतो तोच टिकतो, मात करतो; या प्रकारे वाटचाल होणे हाच इतिहासाचा वा विज्ञानाचा (उत्क्रांतीचा) नियम असल्याने जे जे नष्ट होते ते ते नष्ट होणेच योग्य ठरते. श्रेष्ठ, बलिष्ठ, वर्धिष्णु, प्रगत, प्रगल्भ यांच्या व्याख्या कोणत्या, तर कसोटचा कोणत्या? जेतेपण हीच एकमेव कसोटी वा व्याख्या. ही कसोटीही न-नैतिकच असते. या चौकटीत दाभोलकर स्वतः भूमिका घेऊ इच्छित असले तर, अशी न-नैतिक भूमिका घेणेच श्रेयस्कर असते, आणि कोणत्याही परिस्थितीत कोणत्याही साधन-मार्गांचा वापर करून आपण जेते कसे ठरू एवढीच चिंता आपण करावी; नेते ठरणे म्हणजेच 'मुख्य प्रवाहा'त सामील होणे असते अशी सरळ भूमिका त्यांनी मांडावयास हवी.

पण जर आदिवासींना भाऊ म्हणावयाचे असेल, व ते दर वेळी निर्दयपणे चिरडले गेले असे म्हणावयाचे असेल तर मग आजवरच्या इतिहासाचे, संस्कृतीचे, विज्ञानाचे 'गतिमान नियम' असंस्कृत व अमानुष राहिले आहेत हेही ठामपणे म्हणावे. सरदार सरोवर व नर्मदासागर यांसारखे प्रकल्प हे अमानुष व असंस्कृत गतिनियमांनुसार अटळपणे होत असून त्याला पर्याय नाही असेही म्हणावे. सृष्टिक्रमच असा आहे असे म्हणून खंत व्यक्त करून गप्प बसता येईल किंवा प्रवाहपतित बनून, जेत्यांच्या समूहात दाखल होऊन अधिक यशस्वी होण्याचा "पुरुषार्थ" प्रकट करता येईल.

या बंदिस्त चौकटीतही एक तिसरी भूमिका शक्य आहे. ती अशी की, सृष्टिक्रम एरवी समजा न-नैतिक असला तरी, नैतिक विवेक हे माणसाचे व्यवच्छेदक व अनिवार्य असे वैशिष्ट्यच असल्याने, सृष्टिक्रमाचे गतिमान नियम काहीही असोत, माणूस या नात्याने मानवी कृतींचे नियम हे नैतिकच राखणे हे आपले कर्तव्य आहे व तीच आपली माणूस म्हणून नियतीपण आहे, ही ती भूमिका होय. मनुष्यस्वभावच असा असा आहे, जगात आजवर असेच होत आले आहे, हेच इतिहासाचे, विज्ञानाचे गतिमान नियम आहेत असे युक्तिवाद करून आपण आपल्या कृती ठरवूही नयेत वा त्यांचे समर्थनही करू नये; माणसाला ते शोभत नाही. ज्या क्षणी माणूस स्वतःकडे कर्त्याची भूमिका घेतो त्या क्षणापासून त्याला विवेक करणे प्राप्त असते आणि हा विवेक नैतिक-आध्यात्मिक कसोट्यांवर करणे यातच त्याचे माणूसपण व त्याची सुसंस्कृतता आहे. 'आध्यात्मिक' हा शब्द जाणूनबुजून येथे वापरला आहे. रक्तसंबंध व टोळीचे सभासदत्व यांपलीकडे जाऊन 'आपले हे भाऊ' अशा प्रकारची भाषा आपण करतो तेव्हा ती सामाजिक नीतिनियमांपलीकडची भाषा असते. ही भगवान बुद्धांची, येशू ख्रिस्ताची, पैगंबर महंमदांची, महात्मा जोतिबा फुल्यांची भाषा आहे व ती बुद्धीच्या अतीत जाणाऱ्या 'दर्शना' वर आधारलेली भाषा आहे.

दाभोलकरांनी 'सेतू'ची, 'सेतू बांधले जाण्या'ची गोष्ट केली आहे. इथेही प्रश्न उपस्थित होतात. इंग्रजांनी हिंदुस्थान जिंकून घेण्यासाठी अनेक हिंदी

व्यक्तींना आपले हस्तक बनवून त्यांचा वापर केला; त्यांना पुढे वेगवेगळ्या प्रकारची बक्षिशीही दिली. या सर्वांच्या संदर्भात, 'सेतू'चा वापर करून ते 'मुख्य प्रवाहा'त सामील झाले असे म्हणावयाचे का ? त्यांची तुलना हनुमानाशी करावयाची का ? राम व रावण यांच्यात रामाचा पक्ष हा सत्याचा; न्यायाचा पक्ष तर रावणाचा पक्ष असत्याचा, अन्यायाचा हा निवाडा आपण आधी केलेला असतो. मग या पार्श्वभूमीवर रामाचा पक्ष घेण्याबद्दल हनुमान वा बिभीषण यांचा गौरव आपण करतो. रामाचा पक्ष असत्याचा, अन्यायाचा पक्ष असे जर आपले मत बनले तर हनुमान व बिभीषण हे निंदेस व अधिक्षेपास पात्र ठरतील हे लक्षात घ्यायला हवे. यातून घ्यावयाचा बोध असा की, 'सेतू'ची संकल्पना राबवावयाचीच असेल तर, प्रथम नैतिक निवाडे करणे आवश्यक असते, आणि असे निवाडे करताना न-नैतिक "गतिमान नियमां"चे प्रामाण्य शून्य असते. कोण जेते ठरले हीच कसोटी वापरली तर निवाडा नैतिक ठरत नाही. धरण-प्रकल्पाच्या समर्थकांचा पक्ष वरचढ आहे, तो जेत्यांचा पक्ष आहे तेव्हा त्या पक्षास मिळून जे पदरात पाडून घेता येईल ते घ्या असे दाभोलकरांना म्हणावयाचे नाही असे मी समजतो. पण मग त्यांना तात्त्विक प्रश्नांची उत्तरे प्रथम शोधावी लागतील. साऱ्या विवेचनाच्या "बाहेरचे" म्हणून ते प्रश्न टाळता येणार नाहीत.

सुसंस्कृततेची, उन्नत संस्कृतीची, विकासाच्या सुसंस्कृत नीतिसंपन्न साधन-मार्गाची व्याख्या काय, आणि अशा विकासाचे स्वरूप काय, वैशिष्ट्ये व लक्षणे कोणती हे प्रश्न उपस्थित करणे ही बौद्धिक चूष वा चैन नाही. अशा प्रश्नांच्या विवक्षित उत्तरांच्या बैठकीवरच मानवी व्यवहारांची उभारणी होत असते. वासाहतिक साम्राज्यवादी शोषणाधिष्ठित विकास प्रक्रियाही अशा विवक्षित उत्तरांच्या अधिष्ठानावरच उभारलेली आहे व आजही क्रियाशील आहे. या उत्तरांची नैतिकता व प्रामाण्य गृहीत धरून, त्या बैठकीवरून दाभोलकर आपला सारा युक्तिवाद रचीत आहेत. या विवक्षित उत्तरांना एक दीर्घ इतिहास असेल, पण या उत्तरांची नैतिकता व प्रामाण्य आम्ही नाकारतो. प्रा. स. ह. देशपांडे, श्री. ना. ग. गोरे व इतरही अनेक मान्यवर दाभोलकरांप्रमाणेच या उत्तरांची अनिवार्यता ("गतिमान नियम" वगैरे), नैतिकता व प्रामाण्य गृहीत धरतात, स्वीकारतात. त्या चौकटीत, अर्थातच, त्यांना समता व न्याय यांची प्रस्थापना हवी असते. जगात शांतता व सौहार्द नांदावयास हवे असते. आमचे असे म्हणणे आहे की त्या चौकटीत "सत्तेचा समतोल", "कल्याणकारी राज्य" अशा मर्यादित व अस्थिर गोष्टी तेवढ्या फार तर शक्य आहेत असे पूर्वापारचा व अलीकडचा इतिहास दाखवून देतो.

या चौकटीलाच आव्हान देणारे आम्ही पहिलेच आहोत असे मुळीच नाही. या चौकटीला आव्हान देणाऱ्यांचीही इतिहासात दीर्घ परंपरा आढळते. अलीकडील घरचे उदाहरण महात्मा गांधींचे आहे. 'हिंद-स्वराज्य'मध्ये त्यांनी हेच मूलभूत प्रश्न उपस्थित करून या चौकटीचे प्रामाण्य व तिची नैतिकता नाकारली.

× × ×

सरदार सरोवर व नर्मदासागर प्रकल्पांनी विस्थापित होणारे बहुतेक सारे आदिवासी नाहीत. केवळ शेतकरी विस्थापित होणार आहेत अशातलाही भाग नाही. बिगर शेतकरी समाजही विस्थापित होणार आहे. दाभोलकरांनी सारी चर्चा आदिवासांना डोळ्यांसमोर ठेवून केली आहे.

आदिवासी जमातींची आजची स्थिती सामान्यतः दयनीय आहे यावर दाभोलकर भर देतात. आदिवासी संस्कृतीचे गोडवे गाणे म्हणजे वास्तवाकडे पाठ फिरविणे आहे असे ते म्हणतात. त्यांचे वर्णन करताना ते म्हणतात, 'दुर्बल माणसाला, दुर्बल संस्कृतीला, दुर्बल समाजाला आणि दुर्बल जीवनपद्धतीला आपण फार काळ बाहेरून संरक्षण देऊ शकत नाही. त्यांना व त्यांच्या जीवन-पद्धतीला सशक्त व विज्ञाननिष्ठ बनवणे हा संरक्षण देण्याचा एकमेव उपाय असतो.' जित-जेते कसोटीवर 'दुर्बल' या शब्दाचा वरील वापर सार्थच आहे. आता, सशक्त आणि विज्ञाननिष्ठ बनवायचे म्हणजे काय याचा विचार दाभोलकरांनी काय केलाय तो पाहू. बागायती शेतीत आणि / किंवा नव्या उद्योगांत त्यांना बसवावे हा पर्याय त्यांनी समोर ठेवला आहे. बागाईत शेती व नव्या उद्योगव्यवसायांत स्थिरावलेली भारतातील सगळीच माणसे व त्यांची जीवनपद्धती सशक्त बनल्याचा प्रत्यय येतो का हा प्रश्न आपण बाजूला ठेवू. खरा प्रश्न त्याही आधीचा आहे. आदिवासींना व

त्यांच्या जीवनपद्धतीला सशक्त व विज्ञाननिष्ठ बनविण्यासाठी त्यांना त्यांच्या पिढीजात निवासक्षेत्रातून व जीवनाधारांपासून निष्ठूरपणे बेदखल करून, विस्थापित बनवून सोडणे आवश्यक आहे का ? आणखी एक प्रश्न, सशक्त व विज्ञाननिष्ठ बनण्याचा लाभ प्रकल्पग्रस्त आदिवासींनाच मिळणे योग्य की या देशातील सर्वच आदिवासींना ? तात्पर्य असे की, सशक्त व विज्ञाननिष्ठ बनवावयाचे म्हणजे नेमके काय याची चर्चा **प्रथम** स्वतंत्रपणे, तत्त्वतः करणे आवश्यक आहे. विभिन्न विकासप्रकल्पांचे समर्थन करण्यासाठी वापरावयाचा तो गोंडस युक्तिवाद नसला पाहिजे.

पर्यायी विकासनीतीवाले आदिवासींना त्यांच्या आजच्या दयनीय अवस्थेत ठेवू इच्छित नाहीत. ते वास्तव जाणत नाहीत हे म्हणणेही गैर आहे. बाहेरून कृत्रिम रीत्या संरक्षण देता येत नाही असे दाभोलकर म्हणतात तेही खरे नाही. रेड इंडियन्स जमातींसाठी 'रिझर्व्हज' (अभयारण्यसदृश)ची व्यवस्था अमेरिकेत अस्तित्वात आहे. असे बाहेरून दिलेले संरक्षण हेपण लादलेले असते आणि दाभोलकर ज्या विकासप्रक्रियेला उचलून धरीत आहेत ती प्रक्रियाही बाहेरून लादलेली असते. सशक्तता, आत्मनिर्भरता व सर्जनशीलता या पद्धतीने प्राप्त होत नाहीत. आदिवासींसाठी शासनाने राबविलेल्या कल्याणकारी वा विकासात्मक विविध विशेष योजनांचे फलित उत्साहवर्धक नाही हा अनुभव दाभोलकर नोंदवितात, पण खोलात जात नाहीत. तथाकथित 'सशक्त व विज्ञाननिष्ठ' आधुनिक समाजाने गेली दीड-दोनशे वर्षे जे सतत आक्रमण चालवले आहे त्याच्या इतिहासात त्यांना जावे लागेल. आदिवासी जमातींना सशक्त बनविण्याविषयी खरी कळकळ असेल तर प्रथम हे आक्रमण, ही लादणूक रोखण्याची आवश्यकता आहे. आधुनिक विकासप्रक्रियेचे बळी बनून ते विकासाच्या मुख्य प्रवाहात सन्मानाने सहभागी होऊ शकत नाहीत. जेता समाज त्यांना बरोबरीच्या नात्याने सहभागी होऊ देणार नाही.

जेथे विकासप्रकल्प झाले नाहीत, जेथून माणसे सक्तीने बेदखल झाली नाहीत तेथील माणसांचे काय झाले ते पाहावे असे श्री. शरद जोशींनी सुचविले आहे. जबरदस्तीने विस्थापित झालेली माणसे भाग्यवान असे म्हणण्याची जर पाळी आज येत असेल तर त्याचा अर्थ वर्तमान विकासप्रक्रिया समर्थनीय व वांछनीय आहे असा होत नाही ही गोष्ट त्यांच्या लक्षात येत नाही. धरण व अन्य आधुनिक विकासप्रकल्प यांच्यामुळे नुकसानभरपाईप्राप्त खेडी आणि उपेक्षित ग्रामीण भाग अशी तुलना न्याय्य नाही. डोंगरदऱ्यांमध्ये, जंगलांमध्ये, खेड्यापाड्यांमध्ये राहणाऱ्या लोकांना सशक्त, आत्मनिर्भर व सृजनशील बनविणारी विकासाची स्वावलंबी आंतरिक प्रक्रिया कोणती, विकासाचा असा नमुना कोणता हा मुद्दा आहे. आदिवासींच्याच संदर्भात आता बोलावयाचे तर, त्यांचे जीवनाधार असलेली निसर्गव्यवस्था—जंगल, पशु, पाणी, जमीन—अधिक समृद्ध बनविणे याला प्राथमिकता असेल. या आधारे त्यांची शेती अधिक सुरक्षित, उत्पादक व काही प्रमाणात बागाईत बनविण्याला योग्य स्थान दिले जाईलच. त्यांच्या निवासक्षेत्रात राहून त्यांना उद्योग करता यावेत यासाठी वेगळ्या औद्योगिक व तंत्रवैज्ञानिक धोरणांचा स्वीकार आवश्यक आहे. पर्यायी विकासनीतीचे हेही एक अंग आहे. लोकसमूहांना त्यांच्या त्यांच्या प्रदेशात पायाभूत व प्राथमिक गरजांच्या बाबतीत स्वाश्रयी व स्वायत्त बनविणे हाच सशक्त बनण्याचा खरा अर्थ आहे. यासाठी जे विज्ञान व तंत्रविज्ञान मदतीला येईल ते लोकांमध्ये प्रथम रुजवणे ही लोकांच्या हितसंवर्धनाच्या संदर्भातली महत्त्वपूर्ण व खरी विज्ञाननिष्ठा होय.

दाभोलकर आपल्या पुस्तकात एके ठिकाणी लिहितात, "— म्हणजे वीज, पिण्याचे व सिंचनाचे पाणी या गोष्टी निर्माण करताना या गोष्टी यापेक्षा स्वस्त दरात निर्माण करण्याचे पर्यायी तंत्रज्ञान उपलब्ध आहे का एवढेच पाहिले पाहिजे व वेगवेगळ्या पर्यायी योजनांना येणारा खर्च व त्यांपासून मिळणाऱ्या या गोष्टींचे प्रमाण एवढीच गोष्ट लक्षात घ्यावयास हवी." स्वस्त या शब्दाची व्याख्या नीट करावी लागेल. आपण ज्या पर्यायांचा विचार करतो त्यांचे एकच अंग तेवढे विचारात घेऊन पुरत नाही. भारतात आपण अनेक आधुनिक उद्योगांनाही ठरवून संरक्षण दिले आहे. ही गोष्ट येथील उदाहरणासही लागू आहे. दाभोलकर 'स्वस्त'ची व्याख्या निश्चित करीत नाहीत. त्यांनी खरोखर सर्व पर्यायांचा चिकित्सक विचार केला का ? केंद्रीय जल आयोग वा केंद्रीय जल मंत्रालय वा तत्सम शासकीय/निमशासकीय यंत्रणांनी त्यांना पुरविलेली

अनुक्रमणिका

आकडेवारी त्यांनी उसनवारीने स्वीकारलेली दिसते. ती त्यांनी तपासून पाहिली का? एखाद्या धरणाने १००० हेक्टर जमीन ओलिताखाली येईल असे कागदावर दाखवले होते पण वर्षानुवर्षे फक्त पन्नास-पंचावन्न टक्केच लक्ष्य गाठले जात असले तर फरक पडतो की नाही? पाण्याची मोठ्या प्रमाणावर चोरी होत असेल, तर चोरलेले पाणीही कोणीतरी वापरीत आहेच ना, असे म्हणणे कितपत श्रेयस्कर मानावयाचे? अशी अनेक अंगांनी चिकित्सा करणे स्वस्त व महागडी या संदर्भात आवश्यक ठरत नाही काय? ज्या पर्यायांचा जल आयोग वा जलसंपत्ती मंत्रालयाचे अभियंते विचारही करीत नाहीत त्या पर्यायांचा विचार दाभोलकरांनी करावयास हवा होता की नाही? पाणी पंचायतचे प्रकल्प, राळेगणसिद्धी, आडगाव, विल्ये हे ग्रामप्रकल्प, तत्सम इतर प्रकल्प हे व्यवहारात उतरविलेले पर्यायच आहेत ना? त्यांची योग्य दखल दाभोलकरांनी घेतलेली नाही. म्हणजे जी गोष्ट पाहायला हवी असे ते स्वत: म्हणतात तीही ते तपासून पाहात नाहीत.

× × ×

भारतात सरदार सरोवर, नर्मदासागर, टिहरी यांसारखी महाकाय धरणे होऊ नयेत हा आंतरराष्ट्रीय राजकारणाचा एक भाग आहे असा शोध आपण लावला असून, तो महत्त्वाचा आहे असे दाभोलकर म्हणतात. अन्नधान्याच्या बाबतीत भारत केवळ स्वावलंबीच बनेल असे नव्हे तर शेतीमाल निर्यात करण्याची क्षमता या धरणप्रकल्पांमुळे भारतास प्राप्त होईल, आणि भारताने असे बलवान व्हावे ही गोष्ट बड्या, सधन राष्ट्रांना नको आहे. धरणांद्वारे विद्युत् निर्माण करून उद्योगीकरणाचा व्याप वाढवून भारताने महासत्ता बनावे ही गोष्टही बड्या राष्ट्रांना नको आहे. या कारणास्तव भारतास समर्थ व संपन्न बनविणाऱ्या सर्वच मोठ्या व महत्त्वाकांक्षी विकासप्रकल्पांना, या विकासप्रकल्पांच्या पायाशी असलेल्या विकासनीतीला खीळ बसावी ही या राष्ट्रांची इच्छा आहे. पर्यावरणवाद, पर्यायी विकासनीती यांचा पुरस्कार करण्यास परदेशातून जे प्रोत्साहन व पाठबळ मिळत आहे, तिकडील जे देशोदेशींचे पर्यावरणवादी गट व संघटना नर्मदाप्रकल्प, टिहरी धरण यांना विरोध करीत आहेत त्यांचा खरा हेतू भारतास दुबळे करण्याचा, कायम दुबळे ठेवण्याचा आहे. या अर्थाने, नर्मदाप्रकल्पास होणारा विरोध हा आंतरराष्ट्रीय राजकारणातला डावपेच आहे असे दाभोलकरांचे म्हणणे. दाभोलकर म्हणतात, "(बड्या राष्ट्रांना) कोणत्याही परिस्थितीत नर्मदाप्रकल्प व्हावयास नको आहे. आम्ही आमच्या विजेचा प्रश्न यांची मदत न घेता आमच्या पाण्याच्या जोरावर सोडविणार हे यांना परवडणारे नाही. आमचे अन्नधान्याचे प्रश्न कायमचे सुटून आम्ही यांच्या दारात जाणार नाही हे यांना मानवत नाही. आम्ही यांच्या घरी जाऊन स्वस्त किमतीने अन्नधान्य, अन्नपदार्थ विकू ही कल्पनाही अमेरिकन शेतकरी सहन करू शकत नाही.– नर्मदाप्रकल्प ही केवढी मोठी झेप आहे हे त्यांनी ओळखलय, आम्ही अजून ओळखलेले नाही."

जागतिक राजकीय आखाड्यात सत्तास्पर्धा चालते, आपल्या तुलनेत इतर राष्ट्रे दुबळी ठरावीत/राहावीत, राष्ट्रे आपल्यावर अवलंबून असावीत या दृष्टीने डावपेच आखले जातात, कर्जबाजारीपणा व परावलंबन यांचा फायदा उठवून स्वत:स अनुकूल आर्थिक धोरणे वा कृती विकसनशील देशांवर लादल्या जातात ही परिचित गोष्ट आहे. स्वत:चा मुद्दा सिद्ध करण्यासाठी दाभोलकरांनी कोणता संबंध दाखवून द्यायला हवा होता? नर्मदाप्रकल्प, टिहरी धरण यांसारख्या विकासप्रकल्पांना पर्यावरणीय समतोलाच्या व निकोपतेच्या भूमिकेमधून विरोध करणारे परदेशातील छोटे गट/संघटना व व्यक्ती यांचा व वरील राजकारणी डावपेचांचा आतून संबंध आहे ही गोष्ट दाखवून देणे आवश्यक होते. हा संबंध दाभोलकर दाखवून देऊ शकलेले नाहीत. जास्त आक्षेपार्ह गोष्ट अशी की, आपला युक्तिवाद साकार होण्यासाठी असा संबंध जोडून दाखविता येणे आवश्यक आहे याचेही भान ते प्रकट करीत नाहीत.

सरदार सरोवर प्रकल्पास जागतिक बँकेने मदत दिली आहे. ही बँक धनको वा सावकार आहे. या बँकेची सूत्रे तिला मोठ्या प्रमाणात भांडवलपुरवठा करणाऱ्या सधन राष्ट्रांच्या हाती आहेत. जागतिक बँक कर्ज देते हा कशाचा पुरावा मानावयाचा? दाभोलकरांचे म्हणणे खरे मानले तर जागतिक बँकेने कर्ज देऊन भारताला चक्रव्यूहामध्ये अडकविल्याचा डाव सधन राष्ट्रांनी साधलाय असे तरी म्हटले पाहिजे किंवा सधन राष्ट्रांची अधिकृत भूमिका भारत समर्थ व स्वावलंबी बनण्याच्या विरोधात नाही असे तरी म्हटले पाहिजे. यांपैकी कोणताही अन्वयार्थ लावला तरी दाभोलकरांचा युक्तिवाद अडचणीत येतो.

नर्मदाप्रकल्पास व टिहरी धरणास विरोध, पर्यायी विकासनीतीचा पुरस्कार हे एक गुप्त जागतिक कारस्थान आहे व आपले कारस्थान यशस्वी करण्यासाठी भारतातील आंदोलकांना ते पैसा पुरवीत आहेत; या पैशाच्या बळावरच येथील आंदोलन चालले आहे असे आरोप प्रकल्पाचे समर्थक करीत असतात. यासाठी पुरावा सादर करण्याची जबाबदारी आरोप करणाऱ्यांनी पार पाडलेली नाही. परदेशी निधी-संस्थांची मदत भारतातील अनेकानेक संस्थांना मिळते. आंदोलनात सहभागी असलेल्या गट / संस्था यांच्यापैकी काहींना परदेशी मदत मिळते हा पुरेसा पुरावा मानला जात आहे. पण कारस्थान साध्य करण्यासाठी पैसा दिला जात आहे व तो घेतला जात आहे ही गोष्ट सिद्ध करण्याच्या दृष्टीने उपयोगी असा तो पुरावा अजिबातच नाही. कारण याच न्यायाने सरदार सरोवरासाठी परदेशी पैसा घेणारे सरकारही कारस्थानात सहभागी आहे असे मानावे लागेल.

पर्यावरणाचा मुद्दा पुढे करून नर्मदाप्रकल्पाला खीळ घालण्यामागचे परदेशी पर्यावरणवादी गटांचे व पत्रकारांचे खरे हेतू काय आहेत हे माहीत असूनही, स्वतःचे हेतू साध्य करून घेण्यासाठी येथील प्रकल्पविरोधी आंदोलक परदेशियांचा फार कल्पकतेने उपयोग करून घेत आहेत असे दाभोलकरांनी म्हटले आहे. भारतविरोधी मंडळींशी राजकारणी शय्यासोबत करण्याइतक्या हीन, अनैतिक पातळीवर आंदोलक उतरले आहेत हा अतिशय गंभीर बदनामीकारक आरोप दाभोलकर करतात. नर्मदाप्रकल्पावरूनच्या वादात दोन्ही पक्ष खालच्या पातळीवरून आरोप-प्रत्यारोप, युक्तिवाद करीत आहेत अशी खंत व्यक्त करणाऱ्या दाभोलकरांनी स्वतःच वरील प्रकारचा आरोप करावा ?

जगभर पर्यावरणवादी गट व संघटना नर्मदाप्रकल्पास विरोध करीत आहेत. पर्यावरणवादी जागतिक चळवळीचा तो एक भाग आहे. पाश्चात्त्य सधन देशांची सरकारे (यात जपानचाही आपण समावेश करू) आणि हे पर्यावरणवादी गट यांच्यात असलेला फरक स्वीकारण्याचे साधे औचित्य दाभोलकर दाखवीत नाहीत. हे गट या सरकारांचे वा या देशातील साम्राज्यवादी मतलबी हितसंबंधिकांचे हस्तक आहेत हे ते गृहीतच धरतात. या पर्यावरणवादी गट/संघटनांची त्यांच्या त्यांच्या देशातील प्रस्थापित व्यवस्थेशी व सरकारांशी लढाईच चाललेली आहे याची दखल दाभोलकरांना नाही. ते असो. पण आपण हा गंभीर आरोप करीत आहोत हे जाणून आरोप करण्याला भक्कम बळकटी देणारा आधारभूत पुरावा त्यांनी सादर करावयास हवा होता.

जागतिक पर्यावरणवादी चळवळ अस्तित्वात आहे, कार्य करीत आहे ही वस्तुस्थिती आहे. पण ही उघडपणे चाललेली चळवळ आहे. या चळवळीत एकत्र आलेले परदेशी गट तिसऱ्या जगातील विकासप्रकल्प व विकासनीती यांना लक्ष्य करूनच तेवढे काम करीत आहेत अशी मात्र वस्तुस्थिती नाही. त्यांची झटापट बव्हंशी स्वतःच्याच राष्ट्रांशी चाललेली आहे. हे गट त्यांच्याच सरकारांचा व बहुराष्ट्रीय कंपन्या, आंतरराष्ट्रीय यंत्रणा यांचा रंग उघडा करीत आहेत. स्वतःच्या देशांमधील जंगले सुरक्षित ठेवून तिसऱ्या जगातल्या देशांमधील घनदाट प्राकृतिक अरण्ये नष्ट करण्याबद्दल पाश्चात्त्य सधन देशांना त्यांनी टीकेचे लक्ष्य बनविले आहे. आण्विक चाचण्यांमुळे पॅसिफिक महासागरातील आदिवासी समाजांवर आलेले संकट जगासमोर यावे यासाठी कृती संघटित केल्या आहेत. जागतिक पर्यावरणवादी चळवळीची शक्ती कमी व्हावी म्हणून मग ही सरकारे आपले एजंट त्यांच्यात घुसवून घातपाती कृत्ये करण्याच्या घटनापण घडल्यात.

याउलट, मुंबई-कलकत्ता या शहरांमधील भुयारी रेल्वे वा पाणीपुरवठे वा रस्ते-गटारे यांसारख्या प्रकल्पांपासून ते नर्मदाप्रकल्पापर्यंत लहानमोठी कर्जे काढून 'विकास' घडवून आणणारे या देशातील राज्यकर्ते–नियोजनकार, अर्थशास्त्रज्ञ–अभियंते–शास्त्रज्ञ मंडळी भारताला प्रचंड कर्जाच्या गाळात रुतवीत आहेत आणि एक प्रकारची नवी मानसिक व भौतिक गुलामी निर्माण होण्याची वाट मोकळी करून देत आहेत.

अमेरिकन सेनेटपुढे नर्मदाप्रकल्पविरोधक आपली बाजू मांडायला जातात, विश्व बँकेसमोर जातात याकडे बोट दाखवून, हा जणू कारस्थान सिद्ध झाल्याचा पुरावाच होय असे भासवले जात आहे. दाभोलकरांनीही याची री ओढली आहे. अमेरिकन सरकारने कोणती भूमिका घ्यावी याचा निर्णय करण्यासाठी सेनेटने नेमलेल्या समितीपुढे साक्ष द्यायला समर्थक पण गेले होते. ही एक गोष्ट; दुसरे असे की, नर्मदाप्रकल्प

व्हावा की नाही ही गोष्ट अमेरिकन सेनेट ठरविणार नव्हती, तर प्रकल्पास कर्जाऊ मदत देणाच्या बाबतीत विश्व बँकेत अमेरिकेने कोणती भूमिका घ्यावी या मुद्द्यावर आपली शिफारस देणार होती. समितीला विरोधकांचे म्हणणे जाणून घ्यावयाचे होते. ज्या क्षणी भारत सरकार मोठ्या विकासप्रकल्पांसाठी वा अन्य प्रकल्पांसाठी मोठ्या प्रमाणावर परदेशातून कर्जाऊ वा अन्य प्रकारे पैसा उभा करते त्या क्षणी देशाबाहेरची सरकारे वा निधी संस्था या एक 'वादी-प्रतिवादी'-मध्ये दाखल होतात. ही गोष्ट खुद्द भारत सरकारला अमान्य करता येत नाही; विश्व बँक, आंतरराष्ट्रीय नाणे-निधी भारतावर आर्थिक धोरणांच्या क्षेत्रात सूचना करतात, दबाव आणतात, शर्ती घालतात. आमचे सरकार विनाशकारी मार्गाने वाटचाल करण्यासाठी तुमच्याकडे पैसे मागत आहे, पैसे देऊन यात तुम्ही सहभागी होऊ नये असे पटवून देण्याचा प्रयत्न गैर कसा ? आणि हा प्रयत्न गुप्तपणे झालेला नाही.

नर्मदाप्रकल्पाला विरोध, पर्यायी विकासनीतीचा पुरस्कारही या देशातल्या काही मंडळींची धूर्त राजकीय खेळी आहे असेही दाभोलकरांनी म्हटले आहे. ते म्हणतात, "विरोध करणाऱ्यांपैकी एकाने कालपरवा स्वच्छपणे लिहिलंय– 'उद्याच्या महाभारतीय युद्धाचे हे एक आऊटपोस्ट आहे!' (पृ. २) हे 'एक' म्हणजे श्री. शरद पाटील होत असे पुस्तकाच्या अखेरीस आपल्या लक्षात येते. त्यांचे पुढील विधान दाभोलकर उद्धृत करतात : भारतीय स्वातंत्र्यलढ्याप्रमाणेच आदिवासी राज्याचा हा स्वातंत्र्यलढा आहे, आणि म्हणून दोन्ही लढ्यांची व्यूहरचना ढोबळपणे सारखी आहे, व "पश्चिम भारतीय स्वायत्त आदिवासी राज्याची चळवळ ही पहिली चळवळ आहे की जी जात–वर्ग–स्त्रीदास्यान्ताचे उद्दिष्ट घेऊन कूच करीत आहे. हे राज्य झाले तर ते आत्मसंतुष्ट नसेल. जात-वर्ग-स्त्रीदास्यान्ताच्या महाभारतीय युद्धाचे एक आऊटपोस्ट असेल." पुढे दाभोलकर म्हणतात, "... या स्वायत्त आदिवासी राज्याचे म्हणाल तर भारताच्या नेमके छाताडावर जगभरच्या लाल आणि नव्या हिरव्या झेंड्यांना रोवण्यासाठी जागा तयार होईल. आणि तेथेच कोठेतरी या समाजाला मध्ययुगाकडे नेऊन बरबाद करू शकणारी पर्यायी विकासनीती राबवली जाईल... महत्त्वाचे म्हणजे आपल्या देशाच्या नेमका मध्यावर वलय संस्कृतीचा अभिमान बाळगणारा काश्मीर तयार होईल." (पृ. १५३)

क्लॉड अल्वारीस व रमेश बिलोरी यांच्या 'डॅमिंग द नर्मदा' या पुस्तकातल्या एका वाक्याचे भाषांतर दाभोलकर पुढीलप्रमाणे करतात– (जलविद्युत व औष्णिक विद्युत यांचे परस्परप्रमाण १९८० ते १९९० या काळात झपाट्याने असंतुलित होत होते; ते जलविद्युत्‌निर्मितिक्षम महाधरणांच्या योजनांनी पुनरपि संतुलित करण्याची क्षमता संपादित करण्याचा) "नेमक्या त्याच सुमारास जगभरच्या नव्या हिरव्या झेंड्याने परदेशात एक पुस्तक प्रसिद्ध केले. त्यात त्यांनी अभिमानाने म्हटले– "संपूर्णपणे बेसावध असताना भारतातल्या विकासप्रकल्पांना आम्ही खिंडीत गाठून मारले आहे. . ." आता, मूळ पुस्तकातले विधान फक्त सरदार सरोवर प्रकल्पास उद्देशून आहे आणि ते असे आहे : 'Project had not bargained for a major, compaign by environmentalists against the project worldwide. Neither did they even imagine that the Government of India's Department of Environment and Forest would attempt to throw the spanner in the wheels.' (पृ. ९९ वर उद्धृत)

नर्मदाप्रकल्पाला विरोध हा एका व्यापक युद्धनीतीचा भाग आहे असा दाभोलकरांचा निष्कर्ष आहे. पर्यायी विकासनीतीचा स्वीकार या देशात व्हायला हवा असे मत बाळगणाऱ्यांनी 'युद्धनीती'चा विचार करावा यात गैर काहीच नाही. पर्यावरणाचा मुद्दा पुढे करावयाचा हेतू काही वेगळाच खरोखर असावयाचा अशा स्वरूपाचा अप्रामाणिकपणा, बेरकीपणा गैर म्हणता येईल. तशी वस्तुस्थिती आहे असे दाभोलकर म्हणतात. या त्यांच्या आरोपाची तपासणी करूया.

या देशात साम्यवादी राज्यक्रांती घडवून आणायचे उद्दिष्ट बाळगणारी कम्यूनिस्ट चळवळ स्वातंत्र्य मिळाल्या वेळेपासून कार्यरत आहे. पण ती एकच एक सलग चळवळ आहे असे म्हणता येत नाही. तेलंगणच्या उठावाचे नेतृत्व करणारा कम्यूनिस्ट पक्ष आज दुभंगलेला आहे, व हे दोन्ही पक्ष निवडणुकांच्या चौकटीत स्थिरावले आहेत. याबद्दल असंतोष निर्माण होऊन नक्षलवादी चळवळ उत्पन्न झाली. डोंगर-






खोऱ्यांतील लोकांमध्ये आपला मुख्य अड्डा (बेस) जमवावा असा या चळवळीचा प्रयत्न आहे. पण या चळवळीची पाळेमुळे फक्त आदिवासींमध्येच रुजत आहेत असे दिसत नाही. किंवा आदिवासींमधील सगळ्या चळवळी/संघटना साम्यवादी वा नक्षलवादी आहेत असेही आढळत नाही. पूर्वास्पृश्य, मागास जातीय (ओबीसी), भटके-विमुक्त व आदिवासी यांच्यात राजकीय अस्मिता जागृत झाली आहे तिचे श्रेय साम्यवादी विचारप्रणाली वा नक्षलवादी चळवळ यांना नाही हे लोकशाही राज्यपद्धतीच्या स्वीकाराचे फलित आहे. या अर्थाने ही स्वागतार्ह गोष्ट आहे. असे म्हणायला जागा आहे की ही नवजागृत व नवसंघटित राजकीय अस्मिता आपल्या प्रभावाखाली यावी व या समूहांच्या बळावर येथे साम्यवादी सत्तेची प्रस्थापना व्हावी अशी नीती साम्यवादी विचारांच्या चळवळींनी / संघटनांनी अंगिकारिली आहे. यात अप्रामाणिकपणा कोणता ? राजकीय दूरदृष्टी असे याचे वर्णन करता येईल. उदाहरणार्थ, नक्षलवादी वा श्री. शरद पाटील यांनी आपली युद्धनीती लपवून ठेवलेली नाही. 'महाभारतीय युद्ध' या शब्दांनी बिचकण्याचे काय कारण ?

एका ना एका डाव्या राज्यक्रांतीची स्वप्ने पाहणारी, त्या दिशेने राजकारणी डावपेच खेळणारी काही मंडळी पर्यावरणवादी चळवळ आपल्या प्रभुत्वाखाली आणण्याची खेळी खेळत असण्याची शक्यता जरूर आहे. पण असेही आढळते की पर्यावरणाचे रक्षण व संवर्धन, पर्यायी विकासनीती तळागाळाच्या लोकांच्या दैनंदिन जीवनाशी घनिष्टपणे निगडित आहे ही गोष्ट अनेकानेक डाव्या विचाराच्या मंडळींच्या ध्यानी आली आहे; त्यांच्या डाव्या विचारप्रणालीचा आशय बदलतो आहे. पर्यावरणवादी चळवळीचा आपल्या वेगळ्या हेतूंसाठी वापर करून घेण्याच्या अंतस्थ हेतूने शिरलेले कोण व सच्चे कोण हा नीरक्षीर-विवेक भारतातल्या पर्यावरण चळवळीला जरूर करावा लागणार आहे, दक्ष राहावे लागणार आहे. त्याच वेळी डावी विचारप्रणालीच एक नवा आशय धारण करू शकते ही गोष्ट पण ध्यानात घेतली पाहिजे.

काही लोकांची खेळी आणि साऱ्या पर्यावरणवादी चळवळीची भूमिका यांत दाभोलकर अक्षम्य अशी गल्लत करतात. श्री. शरद पाटील हे तर पर्यावरणवादी चळवळीत आज कोठे नाहीतच. भारतातील सर्वोदय चळवळ ही आज तरी पर्यावरण चळवळीशी एकरूप झालेली नाही. वस्तुस्थिती अशी आहे, की व्यापक पर्यायी विकासनीतीच्या भूमिकेमधून अखिल भारतीय पातळीवर चळवळीची बांधणी करण्याचा संकल्प हरसूर मेळाव्याच्या प्रसंगी गतवर्षी सोडण्यात आला. आजही तिचे स्वरूप स्थानिक व फुटकळ आहे. अनेक भिन्न प्रवाह तीमध्ये आहेत व त्यांच्यात स्वाभाविक ताणतणाव व मतमतांतरे पण आहेत. साधी अखंड दोरीदेखील जेथे नाही तेथे अत्यंत विषारी साप कल्पनेने पाहून भयभीत होऊन अकांडतांडव करण्याइतक्या दुबळ्या व म्हणूनच फाजील आक्रमक बनलेल्या आजच्या राज्यकर्त्यांच्या—प्रशासकांच्या 'युक्तिवादां' ना दाभोलकरांमधला कवी बळी पडलेला दिसतो. 'इस्लाम खतरेमें है' या आरोळीने एकेकाळी आकांत माजला तसेच हे सारे प्रकरण आहे. 'भारताचा विकास व एकात्मता धोक्यात आहे' ही आरोळी ठोकणारेच अप्रामाणिक राजकारणी खेळी खेळत आहेत असे का म्हणू नये ?

उदाहरणादाखल क्लॉड अल्वारीस व रमेश बिलोरी यांच्या पुस्तकातले वाक्य पहा. मुळातले इंग्रजी विधान भारत सरकारच्या पर्यावरण व वनखात्याने घेतलेल्या भूमिकेला उद्देशून spanner in the wheels हा शब्दप्रयोग करते. पर्यावरणाशी निगडित हरकतींचे अनेक मुद्दे या खात्याने उपस्थित केले ज्यामुळे प्रकल्पाचे समर्थन करणे खूप अवघड बनले, आधी लाभ-खर्चाचा विचार करताना ज्या गोष्टींचा विचार करण्याची गरज पडली नव्हती ते नवेच मुद्दे पुढे आले. असे मुद्दे उपस्थित करूनच यापुढे विकासप्रकल्पांची परीक्षा केली पाहिजे अशी नवी भूमिका भारत सरकारनेच घेतली. या भूमिकेशी सुसंगत अशी ही कृती होती. पर्यावरणवाद्यांनी 'खिंडीत गाठून मारले' आणि तेही 'भारतातल्या विकासप्रकल्पांना' असे भाषांतर बरोबर कसे ठरते ? असे म्हणता येईल की जगभर पर्यावरणवाद्यांनी नर्मदाप्रकल्पास परिणामकारक विरोध संघटित केला आणि त्यामुळे प्रकल्प समर्थकांना विश्व बँकेपुढे परत समर्थन करण्याची पाळी आली, आणि पर्यावरण व वनखात्याने हरकती उपस्थित केल्याने प्रकल्पास मंजुरी मिळणे लांबणीवर पडले याचा लेखकद्वयांना आनंद झाला व तो वरील शब्दप्रयोगातून व्यक्त होतो. पर्यावरणवाद्यांचे प्रयत्न उघडपणेच चालले होते. आपल्याला हवी असलेली गोष्ट अनपेक्षित रीत्या








सरकारी खात्याच्या कृतीनेच घडून आली याचा आनंद वाटला तर अस्वाभाविक ते काय ?

× × ×

पर्यावरणवाद्यांवर भावव्याकुळतेचा आरोप अधून-मधून करीत राहणारे दाभोलकर पुस्तकाचा आरंभच 'माते नर्मदे' अशी साद घालीत करतात. ते म्हणतात, 'जगभरच्या तंत्रज्ञांनी अस्वस्थ होऊन मत्सर करावा आणि नल–अंगद यांचे ऊर अभिमानाने भरून यावेत असे एक विलक्षण शिल्प तुझी तंत्रज्ञ मुले आज तुझ्या तीरावर उभारताहेत.' नल–अंगद यांचे उल्लेखही वाचकांना भावनिक आवाहन करतात व स्वतः दाभोलकरांच्या मनाची घडण स्पष्ट करतात. वरील वाक्यातला 'तीरावर' हा शब्द चुकीचा आहे. काटेकोर वर्णन करावयाचे तर माते नर्मदेच्या छाताडावर भिंत बांधून तिचा प्रवाह अडवला जाणार आहे. 'माते नर्मदे' ही साद मनःपूर्वक घातलेली असेल तर मग 'नदीच्या मृत्यूबद्दल' सुंदरलाल बहुगुणा बोलतात ते हास्यास्पद व भावव्याकुळ म्हणावयाचे कारण उरत नाही.

दाभोलकर स्वातंत्र्यवीर सावरकर यांचे एक अवतरण ( पृ. ४७ वर ) देतात. सावरकरांचे अवतरण देण्याआधी दाभोलकर लिहितात, " (निसर्ग) म्हटले तर भूतोबा, म्हटले तर शिवलिंग, म्हटले तर दगड एवढेच याच्याबाबतीत खरे. " मग सावरकरांचे पुढील अवतरण येते : " अरे, या पंचमहाभूतांना नमस्कार कसले करतोस ? अरे, ही वीज आकाशात असताना तू तिला हजारदा नमस्कार केलेस आणि तिच्यावर सुंदर सूक्ते रचलीस तरी ती एकदा बेगुमानपणे तुझ्यावर येऊन कोसळेल. पण ही तुझी बटीक असे समजून तू जर तिचे नियम समजावून घेतलेस ना तर तू तिला एका दिव्यात बंद करून तुझ्या घरात ठेवशील.–आणि मग लाथेने ठोकरून बटण दाबलेस तरी त्या विजेला पेटावेच लागेल."

गेल्या चारशे वर्षांच्या काळात विज्ञान–तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रात जी नेत्रदीपक कामगिरी झाली तिची एक प्रेरणा कोणती होती, तिच्यामागील दृष्टी व वृत्ती काय होती ते सावरकरांच्या शब्दांमधून चांगले प्रकट होते. 'बटीक' आणि 'लाभ' हे शब्द बोलके आहेत.

निसर्गसृष्टीतील सर्वच गोष्टींकडे असेही बघणे या भूमिकेमधून व वृत्तीतून तिच्याशी व्यवहार करणे शक्य आहे ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे. या दृष्टीलाच वैज्ञानिक दृष्टी आणि या भूमिकेमधून व्यवहार करण्याच्या आग्रहालाच विज्ञाननिष्ठा असे आज मानले जाते. पण वैज्ञानिकांकडूनच या समजुतीतले गंभीर उणेपण दाखवून दिले जात आहे. वैज्ञानिक-अभ्यासाची जी रूढ रीत व चौकट आहे तिच्या गंभीर मर्यादा आज वैज्ञानिकही मान्य करतात.

दाभोलकरांनी आर्ने नेस, फ्रिटजॉफ काप्रा, अँडी लिओपोल्ड, जेन लँपिनर, सिंपसन अशा नावांची वाचकांच्या तोंडावर फेक केली आहे. पण कोणाचेही म्हणणे नीटपणे व पुरेशा तपशिलासह देऊन त्याची चिकित्सा केलेली नाही. निर्जीव आणि सजीव असे सृष्टीचे दोन स्थूल भाग केले तर निर्जीव सृष्टी हीदेखील एक अत्यंत गुंतागुंतीची, स्वयंनियंत्रित (cybernetic), गतिमान व्यवस्था आहे, आणि व्यवस्था म्हणूनच ती सम्यक स्वरूपात जाणून घेता येते हा पहिला मुद्दा. पृथ्वीवरचे हवामान असो की जलचक्र असो, सहज अनुभवास येणारी ही वस्तुस्थिती आहे. सजीव सृष्टीत वरील सर्व वैशिष्टचे तर आढळतातच पण तिच्या गतिमानतेच्या काही पैलूंनी व परिमाणांनी आपण स्तिमित होऊन जातो. रूढ वैज्ञानिक चौकटीत सजीवाची उत्पत्ती हा निव्वळ अपघात ठरतो. असा अपघात प्रयोगशाळेत करविण्याचे व उत्पत्तीच्या अपघाताचे कोडे सोडविण्याच्या खटाटोपात शास्त्रज्ञ आहेत. पण सजीवाची उत्पत्ती हा जर अपघात मानला तर अशा केवळ अपघाती प्रक्रियेतून कोटचवधी वर्षांमध्ये आकारास आलेली सजीव सृष्टी हे एक जास्तच गूढ असे कोडे ठरते. सजीव सृष्टीतले वैविध्य, अगणित प्रक्रियांच्या अगणित साखळचा, आणि मानव या गुणात्मक दृष्टचा अगदी वेगळचा सजीवाचा अवतार हे सर्व निरर्थक, केवळ घडत जाणारे ! स्वतःच्या संदर्भात माणूस निवड, विवेक, सृजन, कृती, हेतू, उद्दिष्टे, चैतन्य, प्रतिभा अशा ज्या ज्या गोष्टींचा प्रत्यय घेतो आणि त्यांना असे शब्दरूप देतो त्या साऱ्या गोष्टी सजीव सृष्टीच्या रचनेत व व्यवहारात आढळतात. आणि शिवाय ज्यांचा योग मानवी मनाला व बुद्धीला लागत नाही अशाही अनेक गोष्टी आढळतात. निसर्गसृष्टीचा एक अंशमात्र असलेल्या मानवाने याचे भान बाळगणे, आपल्या वृत्तीत व व्यवहारात ते प्रकट करणे ही गोष्ट अधिक वैज्ञानिक व विज्ञाननिष्ठ नाही का ?

दुसरा मुद्दा जीवनाच्या सार्थकतेचा आहे. रूढ वैज्ञानिक चौकट घडणाऱ्या सगळचाच घडामोडी या निरर्थक तरी मानते, किंवा ( सोशियो बॉयालॉजी या






शास्त्रशाखेच्या चौकटीत) प्राणिजातीच्या भरभराटीस उपयुक्त शाबित होणाऱ्या गुणवैशिष्टयांनुरूप होणारी यांत्रिक घडामोड असे तरी मानते. पण सजीव सृष्टीच्या इतिहासात अगणित जाती नष्टही पावल्या आहेत हे लक्षात घेता सोशियोबायॉलॉजीचे प्रमेयही निकालात निघते. तसा वास्तविक कशालाच अर्थ नाही, पण माणूस आपल्या सर्व गोष्टींना अर्थ चिकटवितो, कारण तसे केल्याशिवाय जगण्याची उमेदही नष्ट होते, असे म्हणता येईल. किंवा जीवनात सर्व गोष्टींना अर्थ असतो पण अंशमात्र माणसाला त्याची उकल संपूर्णपणे होत नाही; तरीपण, प्रत्यक्षानुभूतीच्या आधारे जीवन अर्थपूर्ण आहे ही श्रद्धा बाळगून तो जगतो, असे म्हणता येईल. यापैकी कोणतीही भूमिका घेतली तरी आपण जे जे काही करतो त्याची अर्थपूर्णता महत्त्वाची ठरते आणि सार्थ, कृतार्थ जीवनाची एक ना एक कल्पना जीवनाधार म्हणून निकडीची ठरते. याचाच अर्थ असा की, कोणतीच मानवी कृती केवळ तांत्रिक व कोणताच मानवी प्रश्न केवळ शास्त्रीय असत नाही. त्याला एक जीवनार्थाचे, म्हणजेच सांस्कृतिक व नैतिक परिमाण असते. हे परिमाण केवळ सामाजिक वा वैयक्तिक असत नाही. विश्व व जीवन यांच्याशी अनिवार्यपणे जोडलेले असल्याने ते आधिभौतिक वा आध्यात्मिक परिमाण असते.

पृथिवी माता, नर्मदामैय्या हे शब्दप्रयोग एक चूष, गंमत म्हणून भाषेत आलेले नाहीत. त्या कविकल्पना नव्हेत. सावरकरांच्या अवतरणातील ' बटीक ', 'लाभ' याही कविकल्पना नाहीत. ते नाते स्पष्ट करणारे अर्थवाही शब्दप्रयोग आहेत. दाभोलकर निसर्गाला समजून घेण्याच्या ओघात ' दगड ' हा शब्द वापरतात. त्या शब्दाचेही असेच आहे.

सावरकरांना शिरोधार्य मानून नर्मदा नदी हा एक निव्वळ पाण्याचा प्रवाह मानून तिला बटीक बनविणारा व्यवहार करावयाचा हेही शक्य आहेच. ते शक्य नाही असे कोणी म्हणत नाही. ती दृष्टी, वृत्ती व व्यवहार कितपत वैज्ञानिक व सुसंस्कृत आहे हे ठरविण्याचा प्रश्न आहे. गर्भात असताना नऊ महिने आणि नंतरही बराच काळ मूल आईच्या जिवावरच स्वतःला पोसते. माणसाचेही असेच आहे. निसर्गसृष्टीच्या जिवावरच त्याचे अखंड पोषण चालते. ' जीवो जीवस्य जीवनम् ' हे सत्य आहे. मुलाचे आईशी जे नाते असते ते निसर्गसृष्टीशी आहे असे मानणारे समाज हे अधिक सुसंस्कृत की पृथ्वी हे केवळ एक कोठार समजून ते उपसत राहण्याचीच वृत्ती बाळगणारे सुसंस्कृत ? खरे नाते कोणाला कळले आहे असे म्हणावे? कोण अधिक वैज्ञानिक वृत्तीचा ?

× × ×

सुंदरलाल बहुगुणा अनेकवार सहजपणे विमानांचा वापर करून परदेशी जातात याचा उल्लेख करून, पृथिवी मातेला टोचे मारून. भोके पाडून तिला जखमी, रक्तबंबाळ करून काढलेल्या खनिज तेलाच्या वापरावर चालणाऱ्या विमानांचा वापर करण्याबद्दल दाभोलकर बहुगुणांचा धिक्कार करतात. बहुगुणा दांभिक वागतात असे त्यांना सूचित करावयाचे आहे. पर्यावरणवाद्यांचे, नर्मदाप्रकल्प, टिहरी बांध यांसारख्या विकासप्रकल्पांचा विरोध करणाऱ्यांचे, पर्यायी विकासनीतीवाल्यांचे वैयक्तिक आचरण, विसंगती, अंतर्विरोध यांनी दूषित आहे, ते प्रसंगी दांभिक बनते ही टीका मोकळ्या मानेने स्वीकारायला हवी. पण आणखीही एक प्रश्न आहे. बहुगुणांसारख्यांना उघडे पाडण्यापुरतेच पृथिवी माता, माते नर्मदे हे शब्दप्रयोग दाभोलकर वापरीत असले तर ही गोष्ट त्यांनी स्पष्ट करायला हवी. एरवी हाच दोष त्यांच्याही पदरात पडतो. समजा, असा खुलासा करून, एक सुसंगत भूमिका त्यांनी घेतली, तर सुसंगतीचे श्रेय त्यांना जरूर मिळेल. पण त्यांची दृष्टी व वृत्ती कितपत वास्तविक, वैज्ञानिक व सुसंस्कृत हा प्रश्न ते अनुत्तरितच ठेवतात असे होईल.

पर्यावरणवादी, धरण-विरोधक, पर्यायी विकासनीतीवाले व्यक्तिगत जीवनात अनेक बाबतींत उणे पडतात याविषयी दुमत नाही. पण त्यांनी उपस्थित केलेले व लावून धरलेले व्यापक प्रश्न व मुद्दे त्यांचे दोष दाखवून दिल्याने बाद ठरत नाहीत. त्यांचे उणेपण वेगवेगळ्या कोनांमधून सूचित करण्याच्या मोहात हे व्यापक प्रश्न व मुद्दे नीटपणे मांडून त्यांचा परामर्श घेण्याचे दाभोलकर विसरतात व त्यामुळे विषयाला न्याय मिळत नाही.

त्यांच्या लेखनातून एका पक्षाच्या भूमिकेचा प्रचार होतो; पण 'दोन्ही सैन्यांमध्ये कृष्ण ' या एका प्रकरणाच्या मथळ्यात अध्याहृत असलेला अपेक्षित तत्त्वबोध होत नाही.

❋ ❋

अनुक्रमणिका








# मंडल आयोगाने उपस्थित केलेले प्रश्न

अशोक चौसाळकर

दोन महिन्यांपूर्वी पंतप्रधान श्री. व्ही. पी. सिंग यांनी मंडल आयोगाच्या शिफारशीतील केंद्र सरकार आणि सार्वजनिक उपक्रमांतील नोकऱ्यांमध्ये शेकडा २७ टक्के जागा इतर मागासवर्गीयांसाठी राखीव ठेवण्याची शिफारस अमलात आणण्याची घोषणा केली. त्यामुळे उत्तर भारतात प्रचंड मोठ्या प्रमाणात दंगली झाल्या. मोठ्या प्रमाणात जीवितहानी आणि वित्तहानी झाली. आज हा प्रश्न सर्वोच्च न्यायालयात गेलेला आहे व न्यायालयाने अंमलबजावणीस स्थगिती दिली आहे. पण दोन्ही बाजूंच्या चळवळी जोरात सुरू आहेत. या प्रश्नावर सध्या विचार कमी व भावना जास्त असा प्रकार झाला आहे. नर्मदेच्या खाली मंडल आयोगाच्या विरुद्ध मत मांडणारांची मुस्कटदाबी होत आहे तर नर्मदेच्या वर आयोगाच्या शिफारशींना पाठिंबा देणारे अल्पमतात आहेत.

मंडल आयोगाने आपल्या समाजापुढे व देशापुढे अनेक प्रश्न उभे केले आहेत. त्यांत राखीव जागांचा प्रश्न महत्त्वाचा आहे. या विषयावर 'नवभारता'त श्री. वसंत पळशीकर व विद्या पटवर्धन यांनी सांगोपांग विचार केला आहे. त्यांच्या बहुतेक मतांशी मी सहमत आहे. त्यामुळे राखीव जागांच्या गुणदोषांची मी फारशी चर्चा करणार नाही. पण भारतीय राजकारणाला या निर्णयामुळे एक नवे व धोकादायक वळण मिळाले आहे. त्याची मी प्रामुख्याने चर्चा करणार आहे.

— १ —

भारताच्या गेल्या शंभर वर्षांच्या राजकारणाचा आपण विचार केला तर आपल्या लक्षात येईल, की भारतीय राष्ट्रीय चळवळीविरुद्ध इंग्रजांनी वेगवेगळ्या जाती आणि जमातींचे खास हितसंबंध निर्माण करून त्या जातींना उभे केले होते. त्यांच्या लोकशाही-विकासाच्या ऊर्मींचा त्यांनी नेहमी प्रतिगामी राजकारणासाठी वापर केला. भारत हे समान अधिकार असणाऱ्या नागरिकांचे राष्ट्र नसून तो देश विविध जाती, धर्म, पंथ व वंश यांनी बुजबुजलेला आहे. येथे लोकशाही व प्रातिनिधिक संस्था व्यवस्थित काम करणार नाहीत म्हणून त्यांनी सामायिक राष्ट्रवादाच्या कल्पनेला विरोध केला. अल्पसंख्य व मागास जातींसाठी वेगळे मतदारसंघ आणि राखीव जागा यांच्या मदतीने त्यांनी हे वेगळेपण जोपासले. 'फूट पाडा व राज्य करा' ही त्यांची नीती होती. मद्रास प्रांतात हे डावपेच मोठ्या प्रमाणात यशस्वी झाले. पण १९३७ सालच्या निवडणुकीत काँग्रेस पक्षाने मद्रास, मुंबई, या प्रांतांत जातिवादी पक्षाचा पराभव केला. १९४७ साली भारत स्वतंत्र झाला. भारताची राज्यघटना तयार झाली. या घटनेने विभक्त मतदारसंघ मोडीत काढले पण अनुसूचित जाती व जमातींसाठी राखीव जागांची तरतूद केली.

भारताच्या राज्यघटनेने सर्वांना समान संधी मिळाली असे मत व्यक्त केले व समान संधी मिळण्यासाठीच अनुसूचित जाती व जमाती यांच्यासाठी राखीव जागा ठेवण्यात आल्या. इतर मागासवर्गीयांसाठी जात हा निकष मानून अनेक राज्यांत जागा राखीव करण्यात आल्या. श्री. व्ही. पी. सिंग यांनी केंद्रातही इतर मागासवर्गीयांसाठी राखीव जागा ठेवण्याची घोषणा केली. पण ही घोषणा करीत असतानाच काँग्रेसची हरकत नसेल तर अल्पसंख्याकांनाही त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात जागा देण्यात येतील. मागासवर्गीय एकूण लोकसंख्येच्या शे. ५२ टक्के असल्यामुळे त्यांना काही प्रमाणात जागा मिळाल्या पाहिजेत असेही ते म्हणाले. भारतीय राज्यघटनेप्रमाणे लोकसंख्येच्या प्रमाणात आपण जागा राखीव ठेवत नाही कारण 'समान संधी'च्या मूलभूत तत्त्वाच्या ते विरोधी आहे. फक्त जे समाज, सामाजिक आणि नैसर्गिक दृष्ट्या मागासलेले असतील त्यांनाच जागा राखीव ठेवण्यात येतील असे भारतीय राज्यघटना सांगते. श्री. विश्वनाथ प्रताप सिंग यांनी चाके उलटी फिरविण्याचा प्रयत्न केला.








– २ –

श्री. व्ही. पी. सिंग यांनी मंडल आयोगाच्या शिफारशी स्वीकारीत असताना आवश्यक अशी पार्श्वभूमी तयार केली नाही याचे कारण असे, की या आयोगाच्या शिफारशी जशाच्या तशा स्वीकारण्यास मोठ्या प्रमाणात लोकांचा विरोध होता. पण श्री. व्ही. पी. सिंग यांच्याजवळ राजकीय मुत्सद्देगिरीचा अभाव असून केवळ तावडतोबीचे फायदे मिळविण्यासाठी त्यांनी राखीव जागांचे राजकारण केले. या राजकारणामुळे नजीकच्या काळात त्यांना काही पाठिंबा मिळाला तरी लांबवरचा विचार करता त्यांचे यामुळे नुकसानच होणार आहे.

इतर मागासवर्गीयांना राखीव जागा ठेवणे उत्तर भारतात धोक्याचे ठरणार आहे हे श्री. सिंग यांना माहीत होते. त्यामुळेच या आयोगाचा निर्णय गेली १० वर्षे बासनात ठेवण्यात आला. त्यांना जर हा निर्णय घ्यावयाचा होता तर तो जास्त काळजीपूर्वक व सावधपणे घेणे गरजेचे होते. आतापर्यंत श्री. सिंग यांनीही सहमती तयार करीतच निर्णय घेतले होते. पण हा महत्त्वाचा निर्णय त्यांनी घाईघाईने घेतला. काँग्रेस, भाजप, दोन्ही कम्युनिस्ट पक्ष आणि देवीलाल व चंद्रशेखर यांना न विचारता हा निर्णय घेतला. सामाजिक सुधारणा करण्यासाठी घेण्यात आलेले निर्णय जर व्यापक सहमती तयार न करता घेतले गेले तर त्यांचा योग्य परिणाम होत नाही असा अनुभव आहे. या संदर्भात श्री. व्ही. पी. सिंग व त्यांचे समर्थक यांची भूमिका न पटणारी आहे; कारण ज्या समाजासाठी आपण ही पावले उचलत आहो त्या समाजाचा त्यामुळे जास्तीत जास्त फायदा झाला पाहिजे आणि म्हणून हा निर्णय काळजीपूर्वक व सर्वांना विश्वासात घेऊन घेतला पाहिजे हे याबाबतचे प्राथमिक सूत्र श्री. सिंग यांनी पाळले नाही.

इतर मागासवर्गीयांची मते आपणास मिळतील हा चाणाक्ष हिशेब त्यामागे होता. त्यासाठी श्री. सिंग, श्री. शरद यादव व श्री. रामविलास पासवान यांनी आक्रमक भाषेत इतरांचा अधिक्षेप करीत भाषणे केली. राखीव जागा हा अधिकार नसून विशेषाधिकार आहे हे लक्षात न घेता श्री. शरद यादव यांनी भाषणे केली. त्यांचा उद्देश जातिविग्रहास चालना देणे हा होता.

इतर मागासवर्गीयांसाठी शे. २७ टक्के जागा राखीव होताच सवर्ण जातीतील पुढारलेले गट कार्यरत झाले. राखीव जागाविरोधात विद्यार्थ्यांनी चळवळ सुरू केली. मध्यमवर्गातील व उच्च मध्यमवर्गातील विद्यार्थ्यांचा त्यात समावेश होता. त्यांना आपल्या भविष्याबद्दल चिंता वाटत होती. याच वर्गाने श्री. सिंग यांना गेल्या वर्षी डोक्यावर घेतले होते. या वर्गाचा असा भ्रमनिरास झाला. राखीव जागांचे व्यापक सामाजिक संदर्भ लक्षात न घेता विद्यार्थ्यांची चळवळ सुरू झाली. श्री. व्ही. पी. सिंग यांनी मंडल आयोगाच्या यादीत अनेक पुढारलेल्या जाती समाविष्ट केलेल्या होत्या. त्याचे या विद्यार्थ्यांना वैषम्य वाटत होते. विद्यार्थ्यांची चळवळ सुरू झाल्यानंतर त्यांच्याशी चर्चा करून समझोता करणे श्री. सिंग यांना अशक्य नव्हते पण त्यांनी विलक्षण ताठर भूमिका घेतली. शरद यादव, पासवान, करुणानिधी यांच्या जातिविग्रहाच्या सिद्धान्ताला न बोलता पाठिंबा दिला. त्यामुळे एक महिनाभर मोठ्या प्रमाणात चळवळ सुरू होऊनही सरकार आपला राजकीय प्रतिकार लक्षात घेत नाही असे विद्यार्थ्यांच्या लक्षात आले. राखीव जागांविरोधी मतलबी प्रचारामुळे विद्यार्थ्यांची मने कलुषित झाली होती. त्यांच्या मनात प्रचंड वैताग आणि दबाव होता. त्यामुळे प्रचलित प्रतिकाराचे मार्ग वगळून आत्मदहनाचा व आत्महत्येचा अतिशय धोकादायक व दुःखदायक मार्ग या तरुण-तरुणींनी स्वीकारला. आजवर जवळ जवळ ५० ते ६० तरुण-तरुणींनी स्वतःला जाळून घेतले आहे. काहींनी तर विष प्राशन केले. काहींनी पंख्यास बांधून फाशी घेतली. श्री. व्ही. पी. सिंग यांना शिव्याशाप देत ते मृत्यू पावले. आजही ही प्रक्रिया चालूच आहे.

पण भारताच्या राजकीय अभिजनांची यावरची भूमिका निष्ठुरपणाची होती. तरुण मुले मग ती कोणत्याही जातीची असोत– वैतागाने जीव देतात, सरकारच्या आडमुठेपणामुळे जीव देतात ही धक्कादायक घटना होती. पण जनतादलाच्या सरकारने व श्री. व्ही. पी. सिंग यांनी मुलांच्या भावना समजून घेण्याऐवजी, त्यांना विश्वासात घेऊन आत्महत्येपासून परावृत्त करण्याऐवजी आगीत तेल ओतणारी भाषणे केली. त्यामुळे आत्मदहनाचे प्रमाण वाढले. सरकार राहते की जाते अशी परिस्थिती निर्माण झाली. केवळ सर्वोच्च न्यायालयाच्या स्थगितीमुळे वातावरण थोडेसे निवळले.

आत्मदहनाबाबत जनतादलातील समाजवादी मंडळींची मते मासलेवाईक आहेत. हे आत्मदहनाचे

प्रकार खोटे आहेत. पत्रकारांनी त्यांचा शोध करावा. माणसं वैतागाने मरतात, कोणतीही सुधारणा करावयाची झाली तर किंमत द्यावीच लागणार असे त्यांनी उद्‌गार काढले. स्टॅलिनची दिवसरात्र निंदा करणारांतही स्टॅलिन कसा जिवंत आहे हे यावरून दिसून आले. याबाबत ते तथाकथित 'पुरोगामी' विचारवंतांची संवेदनशीलता बरीच बोथटलेली आहे हे सिद्ध झाले. आत्मदहनाचा प्रकार हा राजकीय प्रतिकाराचा मोठा धोकादायक प्रकार आहे आणि वाटेल त्या मार्गाने तो वेळीच रोखला पाहिजे. हे आमच्या राज्यकर्त्यांच्या लक्षात आले नाही. सरकारच्या अडाणीपणामुळे व आडमुठेपणामुळे अनेक मुलांनी व मुलींनी आत्मदहन करावे, एका संपूर्ण पिढीचे अशा प्रकारे खच्चीकरण व्हावे ही मोठी दुर्दैवी घटना आहे. हा आपल्या समाजावरील कलंक आहे.

सत्ताधारीवर्ग मानवी जीवनाबाबत असा निष्ठुर बनण्याचे कारण म्हणजे सध्याचा भारतीय समाज हा गोंधळलेला समाज आहे. अशा समाजात माणसं मुंग्यांसारखी मरतात. आज पंजाबात, काश्मिरात, आसामात व वेगवेगळ्या जातीय दंग्यांत अनेक माणसं मरत आहेत. त्याबाबत आपण सर्वच जण संवेदनाशून्य बनत आहो. सर्वच पक्षांतील राजकीय पुढाऱ्यांची याबाबतची वृत्ती अंगावर शहारे आणणारी आहे.

आत्मदहनाचा मार्ग हा धोक्याचा मार्ग आहे व त्याचे उदात्तीकरण करणे चूक आहे. हा मार्ग गांधीजींचा मार्ग नाही. त्यास हिंदुधर्मशास्त्रातही मान्यता नाही. राखीव जागा असूनही आपणास नोकरी मिळत नाही म्हणून रामविवेक पासवान नावाच्या मागासजातीय तरुणाने आत्मदहन केले ही गोष्ट दाखवून देते, की राजकीय प्रतिकाराचा हा मार्ग जर जास्त प्रमाणात तरुण माणसं स्वीकारू लागली तर पुढच्या पिढ्या आपणास माफ करणार नाहीत. आपला निषेध नोंदविण्यासाठी हा मार्ग स्वीकारणे कसे अयोग्य आहे हे सर्वांनी तरुणांना समजावून सांगितले पाहिजे.

— ३ —

मंडल आयोगाचा अहवाल डिसेंबर १९८० साली सादर करण्यात आला. त्याची दहा वर्षांनंतर अंमलबजावणी झाली. या दहा वर्षांच्या काळात नवे विद्यार्थी व नवे तरुण पुढे आले. त्यांना या अहवालाची पार्श्वभूमी माहीत नव्हती. त्यांचे याबाबत प्रबोधन झालेले नव्हते. राखीव जागा समाजस्वास्थ्यासाठी आवश्यक आहेत हे त्यांना समजावून सांगितले गेले नाही. आज प्रबोधनाच्या प्रक्रिया बंद झाल्या आहेत व त्यांची जागा सवंग मनोरंजनाने घेतली आहे. त्यामुळे वातावरणनिर्मिती करणे गरजेचे होते.

डॉ. लोहिया यांनी उत्तर भारतात मागास व पुढारलेल्या जातींच्या विग्रहाची कल्पना मांडली. त्यासाठी त्यांनी मोठ्या प्रमाणात प्रचार केला. प्रबोधनाचे महत्त्व त्यांना समजलेले होते पण जातिविग्रहातील विवेकही त्यांनी सातत्याने सांगितला. उच्च जातीयांत जातीयतेचे विष पसरू न देण्याचे त्यांनी सांगितले. त्याचप्रमाणे जातिद्वेषाचा त्यांनी धिक्कार केला. पण अनुयायांना नेत्याच्या विचारांतील विवेक कळत नाही. शरद यादव ज्याप्रमाणे भाषणे करीत आहेत हे पाहिले म्हणजे लोहियांचा त्यांच्या अनुयायांनी केलेला पराभव आपल्याला स्पष्ट दिसतो. डॉ. आंबेडकरांनीही जातिविग्रहाच्या मर्यादा सांगितल्या होत्या.

समाजसुधारणेचा विचार आज नव्या परिवेशात मांडणे गरजेचे आहे कारण आपण एका नव्या पिढीसमोर बोलत आहो. त्या पिढीस जर आपण बरोबर घेतले नाही, समजावून सांगितले नाही तर केलेल्या सुधारणा निष्फळ ठरतील. त्यामुळे गांधी-नेहरू यांचा सहमतीचा मार्ग आजही महत्त्वाचा आहे, त्यास सद्यःकालीन औचित्य आहे हे आपण लक्षात घेतले पाहिजे.

मंडल आयोगाविरुद्ध एवढा मोठा उठाव का झाला हे समजावून घ्यावयाचे असेल तर प्रथम उत्तर भारतातील सामाजिक रचना व राजकारण आपणास समजावून घ्यावे लागेल.

— ४ —

दक्षिण भारतात उत्तर भारतासारखा राखीव जागांविरोधी उद्रेक झाला नाही कारण अनेक वर्षांपासून दक्षिणेकडे मोठ्या प्रमाणात राखीव जागा आहेत. या राखीव जागांखाली जवळजवळ शे. ८० टक्के लोकसंख्या सामावली जाते. द. भारतात ब्राह्मणेतर चळवळीमुळे व केवळ शे. ४ टक्के लोकसंख्या असणाऱ्या ब्राह्मणांच्या भीतीमुळे सर्व जाती त्यांच्याविरुद्ध एकत्र येतात. पण उत्तर भारतात मात्र समाज पुढारलेले, मागासलेले आणि दलित यांच्यात विभागलेला आहे. ब्राह्मण, कायस्थ, बनिया, भूमीहार आणि

राजपूत या जातींची लोकसंख्या शे. २५ टक्क्यांच्या आसपास आहे. आता जाटांचाही त्यात समावेश झाल्यामुळे त्यांची संख्या वाढली आहे. इतर मागास-वर्गीयांची संख्या शे. ४०–४२ टक्क्यांपर्यंत आहे. तर दलितांची संख्या शे. २० टक्क्यांपर्यंत आहे. याचाच अर्थ असा, की उत्तरेत पुढारलेल्या जाती संख्येने बळकट आहेत. या जातींचे राजकारणावर व प्रशासकीय सेवेत वर्चस्व होते पण १९३७ नंतर हळूहळू मागास समजल्या जाणाऱ्या मध्यमस्तरीय शेतकरी जाती पुढे येऊ लागल्या. जमीन-सुधारणा आणि हरितक्रांती यांमुळे त्यांच्या हातात पैसा खेळू लागला. त्यामुळे चरणसिंग, कर्पुरी ठाकूर, रामसेवक यादव, डॉ. मंडल जयराम वर्मा यांच्यासारखे त्या जातीतील पुढारी राजकारणात चमकू लागले. १९६९ च्या उत्तरप्रदेश विधानसभेच्या मध्यावधी निवडणुकांत चरणसिंग यांच्या भारतीय क्रांतिदलास ९९ जागा मिळाल्या. त्यातूनच त्यांनी अहीर, गुजर, जाट आणि राजपूत यांच्या आघाडीची कल्पना मांडली. पण चरणसिंग १९७४ साली काँग्रेसचा पराभव करू शकले नाहीत.

मागासवर्गीयांत जागृती करून त्यांच्यामध्ये हक्कांची जाणीव निर्माण करावी असे डॉ. लोहिया यांचे मत होते. गैरकाँग्रेसवादाबरोबरच अगडा-पिछडा जाति-विग्रहाचे विचारही त्यांनी मांडले होते. चरणसिंग यांनी या काळात डॉ. लोहियांचे मागासवर्गीय पाठीराखे आपल्याभोवती गोळा करीत १९७४ साली भारतीय लोकदलाची स्थापना केली. १९७७ साली जनता पक्षाच्या स्थापनेस लोकदलाची भूमिका महत्त्वाची होती. १९७७ साली मागासवर्गीय जातींतील खासदार व आमदार मोठ्या प्रमाणात निवडून आले. सर्वश्री राम नरेश यादव, कर्पुरी ठाकूर, देवीलाल हे उ. प्रदेश, बिहार आणि हरियानाचे मुख्यमंत्री झाले. सत्तेवर आल्यानंतर १९७८ साली कर्पुरी ठाकूर यांनी बिहारच्या सरकारी नोकऱ्यांत इतर मागासवर्गीयांसाठी शे. २७ टक्के जागा राखीव ठेवण्याची घोषणा केली. त्यामुळे त्या प्रांतात मोठ्या प्रमाणात दंगली झाल्या. या दंगलींत १८८ लोक ठार झाले. इतर मागासवर्गीय व सुधारलेल्या जाती यांच्यात जातिसंघर्ष झाला.

उत्तर भारतातील इतर मागासवर्गीय जातींतील काही पुढारलेल्या जाती या शेती करणाऱ्या जाती आहेत. यादव, कुर्मी, कोयरी, गुजर वगैरे जातींकडे जवळजवळ शे. ५० टक्के जमीन आहे. या जातींकडे गुंडांची सेनाही मोठ्या प्रमाणात आहे. हे मागासवर्गीय शेतकरी व अनुसूचित जाती यांच्यात सातत्याने संघर्ष होतात. बेळछी, पारसबिप्पी, कांजीवाल, आगरा येथे झालेल्या दंगली हरिजन व मागासवर्गीय यांत झालेल्या आहेत.

१९७८ च्या जातीय दंगलीनंतर केंद्र सरकारने या विषयावर सर्वांगीण चर्चा करण्यासाठी एक जुने लोहियावादी नेते डॉ. बिंधेश्वरीप्रसाद मंडल यांच्या नेतृत्वाखाली सामजिक व शैक्षणिक दृष्ट्या मागासलेल्या वर्गांच्या उन्नतीसाठी उपाययोजना सुचविण्यासाठी मंडल आयोगाची स्थापना केली. न्यायमूर्ती भोळे, के. सुब्रह्मण्यम व खासदार नाईक हे या आयोगाचे सभासद होते. श्री. गिल त्याचे सचिव होते. त्यांनी आयोगाच्या एकूण कार्यात फार भरीव कामगिरी केली. पण डिसें. १९८० साली ज्या वेळी आयोगाने आपल्या शिफारशी सादर केल्या त्या वेळी केंद्रात व राज्यात सरकार बदलले होते. काँग्रेसचा पुढारलेल्या जाती हा उत्तर भारतातील राजकारणाचा आधार असल्यामुळे त्या पक्षाने या शिफारशी स्वीकारल्या नाहीत. मात्र बिहारात कर्पुरी ठाकूर-सूत्राप्रमाणे शे. २७ टक्के जागा राखीव ठेवण्यात आल्या. उत्तर प्रदेशातही शे. १५ टक्के जागा इतर मागासवर्गीयांसाठी राखीव ठेवण्यात आल्या. पण मंडल आयोगाच्या शिफारशी तशा दूरगामी होत्या.

– ५ –

डॉ. मंडल यांनी इतर मागासवर्गीयांच्या प्रगती-साठी अनेक शिफारशी केल्या. या शिफारशींपैकी खालील शिफारशी महत्त्वाच्या होत्या—

१) इतर मागासवर्गीय समाज शैक्षणिक व सामा-जिक दृष्ट्या मागास आहेत व एकूण लोकसंख्येत त्यांचे प्रमाण शे. ५२ टक्के आहे (हिंदू शे. ४२, इतर धर्मीय शे. १०) म्हणून सर्व सरकारी, निमसरकारी व शैक्ष-णिक क्षेत्रांतील नोकऱ्यांत शे. २७ टक्के जागा राखीव ठेवण्यात याव्यात. बढतीसाठीही त्यांचा उपयोग व्हावा.

२) सर्व शैक्षणिक संस्थांतही त्यांच्यासाठी राखीव जागा ठेवण्यात याव्यात.

३) विधानसभा आणि लोकसभेतही शे. २७ टक्के जागा इतर मागासवर्गीयांसाठी राखीव ठेवण्यात याव्यात.

४) धंदेशिक्षणाच्या सुविधा कारागिरांना उपलब्ध करून देण्यात याव्यात. त्यांच्या विकासासाठी स्वतंत्र कार्यक्रम राबविण्यात यावेत.

५) ग्रामीण भागात शेतीसुधारणा करण्यात याव्यात आणि अतिरिक्त जमीन मागासवर्गीयांत वाटण्यात यावी.

मंडल आयोगाचा अहवाल एक राजकीय अहवाल होता आणि अनुसूचित जाती व जमातींसारखाच इतर मागासवर्गीयांचा एक खास गट निर्माण करण्याचा या सर्व शिफारशींचा हेतू होता. त्यासाठी अनुसूचित जातींसारखाच हिंदू धर्माने इतर मागासवर्गीयांवर अन्याय केला, त्यांना हजारो वर्षे अज्ञानअंधःकारात डांबून टाकले अशी भाषा वापरली गेली. काही तळातील इतर मागासवर्गीय जाती वगळता इतर बहुसंख्य जातींबाबत हे म्हणणे खरे नव्हते. मंडल आयोगाने हिंदू धर्मशास्त्राचे व धर्माचे केलेले विश्लेषण एकांगी होते. हिंदू धर्मात सातत्याने प्रभावशाली असणारी समंजस आणि सहिष्णु विचारधाराही महत्त्वाची होती. पण त्याकडे दुर्लक्ष झाले.

मंडल आयोगाच्या शिफारशीप्रमाणे भारतात एकूण साडेतीन हजार जाती मागासवर्गीय आहेत. त्यांचा मागासपणा ठरविण्यासाठी सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक निकष लावण्यात आले. पण शेवटी १९३१ च्या जनगणनेचा आधार धरून जात हाच निकष मानण्यात आला. हिंदू धर्माव्यतिरिक्त मुसलमान आणि ख्रिश्चन धर्मीतील मागासवर्गीयांचा त्यात समावेश करण्यात आला. मंडल आयोगाची राजकीय आरक्षणाची शिफारस सध्या तरी कुणी मान्य केलेली नाही. श्री. व्ही. पी. सिंग याबाबत गप्प आहेत पण श्री. शरद यादव व रामविलास पासवान यांना ती मान्य असण्याची शक्यता आहे. पण ती शिफारस धोकादायक आहे, म्हणून तिचा स्वीकार करू नये.

मुख्य भांडणाचा प्रश्न हा नोकऱ्यांतील राखीव जागांचा झाला आहे. त्याविरुद्धच हे आंदोलन उभे राहिले आहे. आरक्षणामुळे वर्षाकाठी जवळजवळ ४० ते ५० हजार जागा इतर मागासवर्गीयांना मिळणार आहेत व खुल्या स्पर्धेतील लोकांसाठी तेवढ्याच जागा कमी होणार आहेत. या राखीव जागांची इतर मागासवर्गीयांसाठी आवश्यकता आहे का ? या जागा जर इतर मागासवर्गीयांना द्यावयाच्या असतील तर त्याचे निकष काय असावेत ? हे प्रश्न महत्त्वाचे आहेत.

– ६ –

सरकारी नोकऱ्यांतील राखीव जागांमुळे अनुसूचित जाती व जमातींमध्ये नवा मध्यमवर्ग निर्माण झाला आहे. गेल्या ४० वर्षांत या सवलतीचा फायदा घेऊन लाखो कुटुंबे चांगले जीवन जगत आहेत, इतरांना प्रेरणा देत आहेत, ही गोष्ट खरीच आहे. सध्या राखीव जागांचा फायदा घेणाऱ्यांनीही ही गोष्ट मान्य करावी. राखीव जागांमुळे प्रशासनात सर्वांचा सहभाग वाढतो आणि आपलेपणा निर्माण होतो ही गोष्ट खरी आहे.

अनुसूचित जाती व जमातींप्रमाणेच इतर मागासवर्गीयांना राखीव जागा असाव्यात ही गोष्टही मान्य करण्यासारखी आहे. पण 'इतर मागासवर्गीय' या समाजगटाची व्याख्या जास्त काटेकोरपणे केली गेली पाहिजे. भारतीय राज्यघटनेच्या कलम १५(४) आणि १६(४) मध्ये जात हा शब्द वापरला नसून वर्ग हा शब्द वापरला आहे हे आपण लक्षात घेतले पाहिजे. त्याची व्याख्या करीत असताना सर्वोच्च न्यायालयाने बऱ्याच वेळा आपली भूमिका बदलली आहे. पण इतर मागासवर्गीयांसाठी जर राखीव जागा ठेवावयाच्या असतील तर त्यांत समाविष्ट करण्यात येणाऱ्या जातींची परिस्थिती व मागासपण अनुसूचित जाती व जमातींसारखे असावे असा युक्तिवाद सर्वोच्च न्यायालयाने केलेला आहे. न्यायालयाचे यासंबंधीचे मत लौकरच कळेल.

मंडल आयोगाने जात हा घटक मानून एकूण ३,७०० जातींना त्यात समाविष्ट करीत असताना जात हा घटक मानला. १९३१ पासून भारतीय समाजात मोठ्या प्रमाणात बदल होत आहेत. जवळजवळ सर्वच जाती वर्गांत विभागलेल्या आहेत. अनुसूचित जातींतही नवे वर्ग तयार होत आहेत. इतर मागासवर्गीय जातींत तर हे बदल दूरगामी असे झाले आहेत. बारा बलुतेदार व आलुतेदार अनेकविध वर्गांत विभागले आहेत. उत्तर भारतात जाट, यादव, गुजर, कुर्मी, कोयरी या जातींतील वरचे थर सत्तेत सहभागी झाले आहेत. जमिनींचे मालक आहेत. महाराष्ट्रात लेवा पाटील, माळी, धनगर ( काही जाती ) वंजारी, आगरी वगैरे बऱ्याच जाती सुधारल्या आहेत. खुल्या स्पर्धेत त्या आज भाग घेऊ शकतात. त्यांचा समावेश इतर मागासवर्गीयांत झाल्यामुळे सवर्णातील वंचित समाजात मोठ्या प्रमाणात असंतोष निर्माण झाला आहे.

याचाच अर्थ केवळ जात हा निकष न लावता जात व वर्ग हा निकष लावला पाहिजे. वर्गलढे उभारण्याची घोषणा करणाऱ्या डाव्या विचारवंतांनी जात हा घटकच कसा योग्य आहे हे सांगणे योग्य नाही. वर्ग-जात हा घटक लक्षात घेणे गरजेचे आहे. कारण श्री. पळशीकरांच्या अभ्यासात दिसून आल्याप्रमाणे इतर मागासवर्गीयांतील पुढारलेल्या जातीच या राखीव जागांचा लाभ घेतील.

इतर मागासवर्गीयांसाठी जागा राखीव ठेवण्याचे तत्त्व मान्य केल्यानंतर राखीव जागा मागास लोकांनाच मिळाल्या पाहिजेत, हे तत्त्वही सर्वांनी मान्य केले पाहिजे. त्या दृष्टीने बिहारमध्ये १९७८ साली तयार करण्यात आलेले कर्पुरी ठाकूर-सूत्र पायाभूत धरले जावे. या सूत्राप्रमाणे शे. २७ टक्के जागांपैकी–

१) शे. १२ टक्के जागा इतर मागासवर्गीयांतील खूप मागास ज्या जाती आहेत त्यांना जातीच्या आधारावर देण्यात याव्यात.

२) शे. ८ टक्के जागा इतर मागासवर्गीयांत जास्त सुधारलेल्या जातींसाठी राखीव ठेवण्यात आल्या. त्यांतील सुधारलेल्या लोकांना वर्गीय पायावर वगळण्यात यावे.

३) उरलेल्या जागांपैकी शे. ३ टक्के जागा सर्व स्त्रियांसाठी व शे. ४ टक्के जागा आर्थिक मागासांसाठी ठेवण्यात याव्यात.

श्री. ठाकूर यांचे सूत्र मार्क्स, भाजप, काँग्रेस या पक्षांना मान्य आहे. पण शरद यादव, रामविलास पासवान, करुणानिधी यांचा त्यास विरोध आहे. श्री. सिंग यांनाही ते नको आहे.

मंडल आयोगाने तयार केलेली इतर मागासवर्गीयांची यादी निर्दोष नाही; कारण जातिरचनेत गेल्या साठ वर्षांत खूप बदल झाले आहेत. 'अँथ्रापॉलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' या संस्थेने 'पीपल ऑफ इंडिया' नावाची संशोधनपर ग्रंथमाला प्रकाशित करावयास सुरुवात केली आहे. या संस्थेच्या संशोधनानुसार भारतात एकूण १०५६ जाती मागास आहेत. याचाच अर्थ असा, की मंडल आयोगाने ही संख्या तिपटीने वाढविली आहे. राखीव जागा हा एक विशेषाधिकार आहे. ज्यांना गरज असेल त्यांनाच तो मिळाला पाहिजे. सत्तेच्या राजकारणात मतपेट्या ताब्यात घेण्यासाठी करण्यात आलेले मलिदावाटप असे त्याचे स्वरूप ठरू नये.

– ७ –

मंडल आयोगाच्या शिफारशी स्वीकारल्यानंतर सुमारे शे. ७४ टक्के भारतीयांना आपली जात सांगितल्याशिवाय नोकरी मिळणार नाही, सोयी सवलती मिळणार नाहीत ही वस्तुस्थिती आहे. मंडल आयोगामुळे समाजात जातिवाद वाढणार आहे, जातिजातींतील संघर्ष वाढणार आहेत ही गोष्ट खरी आहे. जातीच्या राजकारणाला मंडल आयोगाच्या शिफारशी स्वीकारल्यामुळे खतपाणी मिळणार आहे हे खरे आहे. पण सर्वांच्या विकासास वाव देणारी जातिविग्रहास टाळून राखीव जागांची पुनर्रचना करणे शक्य आहे.

दक्षिण भारतात राखीव जागांमुळे जातिवादास प्रोत्साहन मिळाले. कर्नाटकात श्री. देवराज अरस यांनी जवळजवळ शे. ६६ टक्के जागा राखीव केल्या. त्यांत लिंगायत व वक्कलिगा यांच्यातील काही जातींचा समावेश केला. तमिळनाडूत आपल्या जातीला राखीव जागा असाव्यात म्हणून वण्णटचार या जातीने मोठे आंदोलन केले. राखीव जागांमुळे या राज्यात बहुजातीय अभिजन निर्माण झाला ही गोष्ट चांगली झाली, पण जातिवाद मात्र संपला नाही. जात हा एक विहित स्वार्थ बनला. कर्नाटकात एप्रिल महिन्यात न्यायमूर्ती चेनप्पा रेड्डी आयोगाने आपला अहवाल सादर केला. रेड्डी यांनी इतर मागासवर्गीयांना फक्त शे. २७ टक्के जागा राखीव ठेवाव्यात आणि लिंगायत व वक्कलिगा यांना त्यातून वगळावे अशी शिफारस केली, पण राखीव जागा मिळविण्यासाठी या जाती तयार असतात. त्या स्वतःस वगळावयास मात्र तयार नसतात. राजकारणी माणसांना कोणत्याच जातींना दुखवायचे नसल्यामुळे एखाद्या जातीस वगळण्याचे धाडस सहसा कोणी करत नाही.

मंडल आयोगाला पाठिंबा देणाऱ्या व विरोध करणाऱ्या जातींचे राजकारणाचे स्वतःचे असे आडाखे आहेत. उत्तर भारतातील उच्च वर्णीय जातींना इतर मागासवर्गीयांचे आव्हान सहन होत नाही. त्यांना असे वाटते, की यामुळे आपल्या विकासाच्या संधी कमी होतात. उत्तर भारतातील इतर मागासवर्गीयांनी राजकीय सत्ता जरी मिळविलेली असली तरी समाजातील इतर व्यवहारांत विशेषतः सरकारी नोकरीत ब्राह्मण-कायस्थ-भूमीहार यांचे जास्त वर्चस्व आहे.

राखीव जागांच्या साहाय्याने राजकारणाबरोबरच सरकारी यंत्रणेवरही आपले प्रभुत्व असावे असे त्यांना वाटते. अनुसूचित जाती व जमातींतील पुढाऱ्यांना असे वाटते, की मंडल आयोगाच्या शिफारशी स्वीकारल्यामुळे इतर मागासवर्गीय व दलित जाती राखीव जागा संरक्षिण्यासाठी एकत्र येतील आणि बहुजनसमाज पार्टीचे श्री. कांशीराम सांगतात त्याप्रमाणे ही बहुजनांची आघाडी स्थापन होईल व सत्ता काबीज करील. उच्च जातीयांची सत्ता हरण करता येईल.

पण वास्तवात भारतीय राजकारण केवळ जातीच्या आधारावर चालत नाही. जातीच्या व केवळ मलिद्याच्या आधारावर ते चालले असते तर ते ऐहिक स्वरूपाचे झाले नसते. राखीव जागांचा प्रश्न निर्माण करून, आपापल्या जातींचे पक्ष निर्माण करून क्षुद्र राजकारण करण्याचा प्रयत्न द. भारतात झाला. केरळमध्ये प्रत्येक जातीचा एक पक्ष आहे. त्याविरुद्ध काॅ. ई. एम. एस. नंबुद्रीपाद यांनी १९८७ साली मोठी चळवळ उभारली व डाव्या आघाडीस विजय मिळवून दिला. राखीव जागांचे राजकारण करूनही जनता पक्षाचा १९८० साली, काँग्रेसचा कर्नाटकात १९८३ साली व करुणानिधींचा १९८० व १९८७ साली पराभव झाला नसता. साडेतीन हजार इतर मागासवर्गीय जातींची एकता केवळ अशक्य आहे; कारण त्या सर्व जाती विकासाच्या व प्रगतीच्या वेगवेगळ्या स्तरांवर आहेत. इतर मागासवर्गीय व दलित यांच्यातील उत्पादनसंबंध वर्गीय असल्यामुळे त्यांच्यातही एकी होणार नाही. झालाच तर संघर्ष वाढेल असा उत्तरेकडचा व दक्षिणेकडचाही अनुभव आहे. म्हणून राजकीय स्वार्थासाठी जरी हा निर्णय घेतला गेला असला तरी त्यामुळे राजकीय स्वार्थ खरोखर साधेलच असे मात्र नाही.

– ८ –

राजकीय दृष्टया विचार केल्यास मंडल आयोगाच्या न स्वीकारल्या गेलेल्या शिफारशी जास्त महत्त्वाच्या आहेत हे आपल्या लक्षात येईल. कारण इतर मागासवर्गीयांत कारागीर जातींचा समावेश होतो. त्या जातींतील तरुणांना धंदेशिक्षण देणे, त्यांना वेगवेगळ्या धंद्यांतील कौशल्य संपादन करावयास मदत करणे महत्त्वाचे आहे. त्याचप्रमाणे त्यांना कमी व्याजदरात नवीन धंदे सुरू करण्यास प्रोत्साहन देणे गरजेचे आहे. त्यामुळे राखीव जागांपेक्षा जास्त मोठा रोजगार निर्माण होईल.

शिक्षण क्षेत्रात इतर मागासवर्गीयांना सर्व सोयी व सवलती मिळाल्या. त्यांतील अगदी ज्या वंचित जाती असतील त्यांना शिष्यवृत्त्या आणि वसतिगृहात राहून शिकावयास मिळावे; कारण रोजगाराची बाजारपेठ मर्यादित आहे आणि इतर मागासवर्गांत राजकीय स्वार्थासाठी अठरापगड जातींचा समावेश झाला आहे. त्यात खरेखुरे मागास समाज मागे राहू नयेत याचीही सोय केली पाहिजे. पण राखीव जागांची मागणी बिनखर्ची आहे म्हणून ती सरकारने मान्य केली पण इतर शिफारशी मात्र अजून अमलात आणल्या नाहीत.

शेती सुधारण्याबाबतची आयोगाची शिफारस महत्त्वाची आहे, कारण आजही उत्तरप्रदेश व बिहार या राज्यांत शे. ९२ टक्के कुळांना त्यांच्या मालकीच्या सनदा मिळालेल्या नाहीत. यांत मागासवर्गीय शेतकरी व शेतमजूर मोठ्या प्रमाणात आहेत. प. बंगाल सरकारने गेल्या १० वर्षांत हे काम मोठ्या हिरिरीने पार पाडले. याबाबत मुलायमसिंग व लालूप्रसाद यादव यांची भूमिका बोटचेपीपणाची आहे. या दोन्ही राज्यांत शेती क्षेत्रात अनेक सुधारणा होणे गरजेचे आहे. पण जनतादलाचे ज्येष्ठ पुढारी श्री. देवीलाल यांच्या मते आता जमीनसुधारणा आवश्यक नाही. जनतादलात मध्यम दर्जाच्या शेतकऱ्यांचे वर्चस्व असल्यामुळे त्यांचा जमीन सुधारण्यास व जमीनवाटपास विरोध असणार आहे. राखीव जागांच्या कोलाहलात आयोगाची जास्त महत्त्वाची शिफारस जवळजवळ दुर्लक्षिण्यात आली आहे.

– ९ –

इतर मागासवर्गीयांसाठी व मागास जातींसाठी राखीव जागा ठेवीत असतानाही समाजस्वास्थ्य व परस्परसामंजस्य कसे स्थापन करावयाचे हा आपल्यापुढचा महत्त्वाचा प्रश्न आहे, कारण इतर मागासवर्गीतील अनेकांना राखीव जागांची गरज आहे. त्यासाठी गरज आहे ती समजावून सांगण्याची, चर्चा करण्याची, समझोता करण्याची. थोडक्यात सर्व समाजघटकांत सहमती निर्माण करण्याची. कारण असे जर सामंजस्य निर्माण झाले नाही, आपल्या संख्याबळाच्या जोरावर प्रत्येक जात जर आपणास मागास म्हणून घोषित करू लागली तर त्यातून जातिद्वेष व

जातिवैषम्य वाढेल. कारण राखीव जागांत जातिगत संघटन अध्याहृत असते. व्यापक सहमतीनेच त्याचा विखार कमी होतो. म्हणून राखीव जागा ही राजकीय लाभ-हानीचा, मलिदावाटपाचा प्रश्न नसून तो सामाजिक न्याय प्रस्थापित करण्याचा प्रश्न आहे; हे आपण लक्षात घेतले पाहिजे. त्यामुळेच सामाजिक भारतीय राष्ट्रवादाला धोकादायक ठरणाऱ्या तडजोडी करणे राजकीय पुढाऱ्यांनी कसोशीने टाळले पाहिजे. श्री. विश्वनाथ प्रताप सिंग याबाबत जी धोकादायक भूमिका घेत आहेत त्याबाबत आपण सावध राहिले पाहिजे.

या प्रश्नावर विद्यार्थ्यांशी चर्चा करून त्यांच्या मनातील वैताग व भीती घालविणे गरजेचे आहे. विद्यार्थी आर्थिक निकषावर राखीव जागा असाव्यात असे मत मांडतात. केवळ जातीच्या पायावर जागा राखीव ठेवण्यास त्यांचा विरोध आहे. आरक्षणाचा पाया वर्ग-जाती हा असला पाहिजे. खऱ्याखुऱ्या मागासांना त्याचा फायदा झाला पाहिजे. हजारो वर्षे अस्पृश्यांबाबत असलेली अन्यायाची भाषा खरी आहे. सर्वच इतर मागास जातींबाबत ती खरी नाही. म्हणून चर्चेसाठी श्री. कर्पुरी ठाकूर यांचे सूत्र मूलभूत आधार ठरावा. कम्युनिस्ट पक्षांनी लोहियावाद्यांच्या लोकानुरंजनाकडे लक्ष न देता ठाकूर-सूत्राचा आग्रह धरावा. जितका आग्रह धरायला हवा तितका कम्युनिस्ट धरत नाहीत. उलट, सर्व राखीव जागाविरोधक प्रतिगामी आहेत असे म्हणून मोकळे होतात हे बरोबर नाही. तिन्ही कम्युनिस्ट पक्षांकडून विधायक हस्तक्षेपाची अपेक्षा होती.

इतर मागासवर्गीयांसाठी जागा ठेवताना मंडल आयोगाने तयार केलेल्या यादीऐवजी 'अँथ्रापॉलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया' ने तयार केलेली १०५६ जातींची यादी स्वीकारावी. कारण त्यातील पुढारलेल्या जाती– उदा., यादव, गुजर वगैरेंना त्यातून काढावे म्हणजे इतरांना वैषम्य वाटणार नाही.

इ. स. २००० साली सर्वच राखीव जागांच्या संदर्भात पुनर्विचार करण्यात यावा. पुढारलेल्या व्यक्तींना व जातगटांना त्यातून वगळावे आणि त्या प्रमाणात राखीव जागांची टक्केवारी कमी करावी. पण लगेचच ते शक्य होणार नाही. 'सर्वांना समान संधी' व 'सामाजिक न्याय' हे आपल्या राज्यघटनेचे अंतःसूत्र आहे. ज्यांना गरज नाही त्यांना राखीव जागा मिळाल्या तर त्यास बाध येतो हे आपण लक्षात घेतले पाहिजे.

सामाजिक सुधारणा घडवून आणत असताना घिसाडघाई उपयोगाची नाही हे नामांतराच्या वेळी दिसून आले, कारण लोकशिक्षणाचा मार्ग बिकट असला, वेळखाऊ असला तरी तो अपरिहार्य आहे. या सुधारणा आपण कोणती किंमत देऊन करणार याचाही विचार करावा लागतो. म. गांधी, पं. नेहरू यांनी मानवी मूल्यांना व जीवितांस या प्रसंगी अनन्यसाधारण महत्त्व दिले. आज अध्यक्ष गोर्बाचेव्ह पण त्याच निष्कर्षास आलेले आहेत. रागास राग, प्रतिकारास प्रतिकार, गोळीस गोळी व खुनास खून अशी उत्तरे देऊन आपण पंजाब, जम्मू, काश्मिर व आसामचे प्रश्न नासवले आहेत. संघर्षाचा हा मार्ग मोठ्या धोक्याचा आहे हे आपण लक्षात घेतले पाहिजे. हा नाजूक प्रश्न तर कार्यहानी होऊ न देता अगदी हळुवारपणेच हाताळला पाहिजे. श्री. विश्वनाथ प्रताप सिंग व त्यांच्या सहकाऱ्यांनी हा प्रश्न राजकीय आखाड्यात नेला आहे. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयानंतर तर हा राजकीय विवादाचा मुख्य विषय बनेल. कारण मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने सूचना करूनही या विषयावर सहमती निर्माण करण्याची सध्या तरी सरकारची तयारी दिसत नाही. या आडमुठेपणाचे परिणाम गंभीर होतील एवढाच इशारा याप्रसंगी देता येईल.



# मंडल आयोगाचा अहवाल

मे. पुं. रेगे

राज्यघटनेच्या कलम ३४० ला[१] अनुसरून राष्ट्रपतींनी १ जानेवारी १९७९ रोजी मागासवर्ग आयोगाची नेमणूक केली. श्री. बी. पी. मंडल, भूतपूर्व संसद-सदस्य ह्यांना आयोगाचे अध्यक्ष म्हणून नेमण्यात आले. आयोगाची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात आली होती–

१) सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टचा कोणते वर्ग मागासलेले आहेत हे ठरविणारे निकष निश्चित करणे; २) अशा रीतीने सामाजिक व शैक्षणिक दृष्टचा मागास म्हणून ठरविण्यात आलेल्या नागरिकांच्या वर्गांच्या उन्नतीसाठी जे उपाय योजिले पाहिजेत, त्यांची शिफारस करणे; ३) संघराज्य किंवा कोणतेही राज्य यांच्या कारभाराच्या संबंधात ज्या सार्वजनिक सेवा किंवा पदे ( पोस्ट्स ) आहेत त्यांच्यात ज्या मागासवर्गीय नागरिकांना पुरेसे प्रतिनिधित्व नसेल त्यांच्यासाठी नेमणुका किंवा पदे राखून ठेवण्याची तजवीज करणे कितपत इष्ट किंवा अनिष्ट ठरेल, हे तपासून पाहणे; आणि ४) आपल्याला आढळून आलेली वस्तुस्थिती मांडणारा आणि योग्य वाटतील त्या शिफारशी करणारा अहवाल राष्ट्राध्यक्षांना सादर करणे.

या संबंधात, पूर्वी नेमण्यात आलेल्या मागासवर्ग आयोगाच्या शिफारशींचे, तसेच त्या शिफारशींचा सरकारकडून अंगीकार होण्याच्या आड जे मुद्दे उभे राहिले त्यांचेही परीक्षण आयोगाने पाहिजे तर करावे.

मंडल आयोगाने आपला अहवाल डिसेंबर १९८० मध्ये राष्ट्रपतींना सादर केला. त्या वेळी राष्ट्रपतींना लिहिलेल्या पत्रात जनता सरकार सत्तेवर असताना पंतप्रधान श्री. मोरारजीभाई देसाई यांनी आयोगाची नेमणूक केली होती असा उल्लेख करून श्री. मंडल यांनी पुढे असे म्हटले आहे की, "येथे ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे, की जरी ह्या आयोगाची नेमणूक पूर्वीच्या जनता सरकारने केली होती तरी श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकारने आयोगाला दोनदा मुदतवाढ करून दिली; एवढेच नव्हे, आयोगाच्या कामास सर्व प्रकारे पाठिंबा दिला व सहकार्य केले. यावरून जे दडपलेले, मागासलेले आणि गांजलेले ( सप्रेस्ड, डिप्रेस्ड, ऑप्रेस्ड ) आहेत, त्यांची उन्नती घडवून आणण्याच्या कार्यावरील त्यांची निष्ठा व त्यांच्याशी असलेली त्यांची बांधिलकी स्पष्टपणे व्यक्त होते." पण हा आयोग नेमण्यात श्री. मोरारजीभाई यांची अशीच निष्ठा व बांधिलकी व्यक्त होते असे श्री. मंडल यांनी कुठेच म्हटलेले नाही. मागासवर्गीयांसाठी आयोग नेमणे हा बांधिलकीचा पुरेसा पुरावा होऊ शकत नाही, तो बंद न पाडणे हा पुरेसा पुरावा असतो, असे कदाचित त्यांचे मत असावे.

मंडल आयोगाच्या शिफारशींचे तटस्थपणे परीक्षण होणे राष्ट्रीय एकात्मतेच्या आणि राष्ट्रीय जीवनातील सामंजस्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. पण ही अशक्यप्राय गोष्ट आहे. न्यायाचे पालन झाल्याने केवळ भागत नाही; न्यायाचे पालन झाले आहे हे दिसलेही पाहिजे, असे एक वचन आहे. ह्याच न्यायाने आजच्या एकंदर सामाजिक परिस्थितीत मंडल आयोगाच्या शिफारशींचे तटस्थपणे परीक्षण होणे पुरेसे नाही; तटस्थपणे परीक्षण होऊन आवश्यक ती कार्यवाही होत असल्याचे दिसूनही आले पाहिजे. म्हणजे असे होत आहे हे सर्व संबंधितांना पटले पाहिजे, असे म्हणता येईल. आज हे पटणे अतिशय कठीण आहे. आयोगाच्या शिफारशींचे सार असे, की अनुसूचित जाती आणि जमाती यांच्यासाठी, त्यांच्या लोकसंख्येच्या टक्केवारीला अनुसरून, सरकारी नोकऱ्या आणि शिक्षण संस्थांमधील जागा यांच्यामध्ये २२·५ टक्के आरक्षण ( रिझर्व्हेशन ) करण्यात आले आहे त्याव्यतिरिक्त इतर मागासवर्गीयांसाठी २७ टक्के आरक्षण करण्यात यावे. म्हणजे एकंदर ४९·५ टक्के जागा आरक्षित राहतील व ५०·५ टक्के जागा सर्वांसाठी खुल्या राहतील. भारतीय समाजाचे दूरगामी





अनुक्रमणिका

हित, सरकारी कारभाराची कार्यक्षमता यांना ह्या शिफारशींची अंमलबजावणी बाधक ठरेल ह्या मुद्द्यांच्या आधारे ह्या शिफारशींना जे विरोध करतील, त्यांच्यावर व्यापक सामाजिक हिताची ढाल पुढे करून ते आपल्या जातीय किंवा वर्गीय हिताचे संरक्षण करू पाहत आहेत आणि प्रचलित अन्यायाचे समर्थन करीत आहेत असा आरोप करण्यात येईल. उलट, ह्या शिफारशींचे जे समर्थन करतील त्यांच्यावर त्यांना व्यापक राष्ट्रहिताची चाड नाही, ते उतावीळ, रागाने आंधळे झालेले आहेत, आपल्या बेजबाबदार आणि अव्यवहार्य शिफारशींनी सामाजिक तणाव वाढवून केवळ सवंग लोकप्रियता, पुढारीपण मिळवू पाहत आहेत अशा प्रकारचे आरोप करण्यात येतील. तेव्हा या शिफारशींच्या बाबतीत स्पष्टपणे आणि तपशिलवार बोलणे धोक्याचे आहे हे सर्व चाणाक्ष मंडळींना माहीत आहे. मागासवर्गीयांच्या कल्याणाविषयीच्या ज्यांच्या विशेष आस्थेचा निर्वाळा श्री. मंडल यांनी दिला आहे, त्या श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकारने अहवाल सादर झाल्यानंतर जवळजवळ तीन वर्षे होऊन गेली तरी त्याच्या संबंधात कोणतेही अधिकृत निवेदन केलेले नाही ह्याचे कारणही हेच असणार, असा तर्क करता येतो. हा धोका पत्करूनही अहवालाची शक्य तितक्या मोकळेपणाने चर्चा होणे आवश्यक आहे.

पहिला मागासवर्ग आयोग कै. काकासाहेब कालेलकर यांच्या अध्यतेखाली जानेवारी १९५३ मध्ये नेमण्यात आला होता. आणि त्याने आपला अहवाल १९५५ मध्ये सादर केला होता भारतीय जनतेचे कोणते विभाग सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टया मागासलेले आहेत हे ठरविण्यासाठी ह्या अहवालात पुढील निकष मुक्रर करण्यात आले होते : १) पारंपरिक हिंदू जातिव्यवस्थेत खालचे स्थान; २) जातीच्या किंवा जमातीच्या मोठ्या भागात सर्वसामान्य शैक्षणिक प्रगतीचा अभाव; ३) सरकारी नोकऱ्यांमधील अपुरे किंवा शून्य प्रतिनिधित्व; आणि ४) व्यापार आणि उद्योग या क्षेत्रांत अपुरे प्रतिनिधित्व. ह्या निकषांना अनुसरून अहवालात २३९९ मागासलेल्या जातिजमातींची यादी देण्यात आली होती आणि त्यांतील ८३७ जातिजमातींचे 'अत्यंत मागासलेल्या' असे वर्गीकरण केले होते. आयोगाने भारतातील सर्व स्त्रिया एक वर्ग म्हणून मागासलेल्या आहेत असा निर्णय केला होता, हे उल्लेखनीय आहे. मागासवर्गीयांच्या प्रगतीसाठी आयोगाने जमीनधारणा, ग्रामीण अर्थव्यवस्थेची पुनर्रचना, कुटिर–उद्योग, प्रौढ साक्षरता इ. विविध क्षेत्रांत कोणत्या सुधारणा करण्यात येतील याविषयी तपशिलवार सूचना केल्या होत्या. त्यांच्यात, सर्व तांत्रिक आणि व्यावसायिक शिक्षण संस्थांमध्ये पात्र (क्वॉलिफाइड) मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी ७० टक्के जागा राखून ठेवाव्या आणि सरकारी व निमसरकारी नोकऱ्यांत, पहिल्या दर्जाच्या नोकऱ्यांत २५ टक्के, दुसऱ्या दर्जाच्या नोकऱ्यांत ३३$\frac{1}{3}$ टक्के आणि तिसऱ्या व चौथ्या दर्जाच्या नोकऱ्यांत ४० टक्के अशा जागा राखून ठेवाव्या ह्या शिफारशींचाही अंतर्भाव होता.

कालेलकर आयोगाच्या अहवालाविषयी दोन गोष्टी ध्यानात घेण्याजोग्या आहेत. एक तर, त्याचे निष्कर्ष आणि शिफारशी यांच्याविषयी आयोगाच्या सदस्यांत एकमत नव्हते. तीन सदस्यांचा मागासलेपणा आणि जात यांच्यामध्ये संबंध जोडायला विरोध होता. म्हणजे एखादी जात हिंदू जातिव्यवस्थेमध्ये खालची मानण्यात येते ह्या केवळ कारणावरून तिच्यातील बहुसंख्य लोक मागासलेले आहेत असे मानणे त्यांना मान्य नव्हते. जातीच्या आधारे नोकऱ्यांत राखीव जागा ठेवायलाही त्यांचा विरोध होता. त्यांनी आपले भिन्न, विसंवादी मत अहवालाला जोडले होते. दुसरी गोष्ट अशी, की जरी अहवालात खालची जात हा मागासलेपणाचा निकष म्हणून स्वीकारलेला होता तरी आयोगाचे अध्यक्ष काका कालेलकर यांचेच, ह्या बाबतीत, आयोगाचे काम संपत येण्याच्या घडीला, मतपरिवर्तन घडून आले होते. त्यांनी जरी आपले विसंवादी मत अहवालाला जोडले नाही, तरी अहवाल सादर करताना जे ३० पृष्ठांचे पत्र राष्ट्रपतींना पाठविले, त्यात आपले बदललेले मत त्यांनी मांडले आहे. त्यात ते म्हणतात,

" हिंदूंमधील उच्च जातींनी 'खालच्या' जातीची हेळसांड करण्याचा जो अपराध केला आहे, त्याचे प्रायश्चित्त त्यांनी घेतले पाहिजे अशी माझी खात्री असल्यामुळे फक्त मागासलेल्या वर्गांना ( जातींना ) काय ती सर्व खास मदत करावी आणि उच्च वर्गातील ( जातींतील ) गरीब व पात्र व्यक्तींना ह्या खास मदतीच्या लाभापासून वगळण्यात अनमान करू नये अशी सरकारला शिफारस करायला मी तयार होतो. पण जातीच्या अधिष्ठानावर आधारलेल्या इलाजांचा

